शिक्षणखात्याचा मंजुरी–क्रमांक : पपम १०० (भाषा) (६) ड, दि : १४–१०–१९७०

# बालभारती

## मराठी, पुस्तक सहावे



१९८१

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तकनिर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ

पुणे

प्रथमावृत्ति : १९७१
सहावे पुनर्मुद्रण : १९८१



कागद :
६१×८६ सेमी
६० जी एस् एम्
व्हाईट प्रिंटिंग पेपर

"ह्या पुस्तकाचा कागद महाराष्ट्र राज्य शिक्षण खात्याने सवलतीच्या दरात उपलब्ध करून दिला आहे."

मुद्रणादेश :
पीओ—टीबी/३४३९/८१
(१५०)

मुद्रक :
चंदन दास
न्यू जॅक प्रिंटिंग
वर्क्स प्रा. लि.
मुंबई - ४०० ०१३

प्रकाशक :
बा. गो. थोरात
नियंत्रक,
पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ
मुंबई ४०००१८

## प्रस्तावना

शासनमान्य अभ्यासक्रमानुसार पाठ्यपुस्तकांची निर्मिती व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तकनिर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाची स्थापना झालेली आहे. मंडळाने इयत्ता १ ते ७ पर्यंतच्या विविध विषयांच्या पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीचा कार्यक्रम आखलेला असून सदर पाठ्यपुस्तक त्यानुसार तयार केले आहे. ते तयार करताना शिक्षक, शिक्षणशास्त्रज्ञ आणि विविध शिक्षण-संस्था यांनी पाठवलेल्या सूचनांचा काळजीपूर्वक विचार करण्यात आला असून ते अधिकाधिक निर्दोष कसे करता येईल याकडे लक्ष पुरवण्यात आले आहे.

भारत सरकारने मान्य केलेल्या व महाराष्ट्र शासनाने स्वीकारलेल्या देवनागरी लिपीतील सुधारणा व जोडाक्षर-पद्धती यांचा या पुस्तकाच्या मुद्रणात अवलंब केला आहे.

. . .

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक
निर्मिती व अभ्यासक्रम
संशोधन मंडळ

पुणे :
दि. : २ ऑक्टोबर, १९७०
आश्विन १०, १८९२

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत.

माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.

मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.

माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यांतच माझे सौख्य सामावले आहे.

# अनुक्रमणिका


१. माझे बालपण १
२. गावचा ओढा ५
३. आमची शिल्लक १०
४. फुलपाखरू १४
५. सुकेशिनी १७
६. सुपारीबागेची सहल २२
७. विनोबांच्या सहवासात २७
८. मुहूर्तमेढ ३०
९. रामटेक ३५
१०. शपथ घ्या, शपथ घ्या! ३९
११. निःस्पृह रामशास्त्री ४३
१२. सर्कशीत चिमणराव ४९
१३. काझीरंगा ५४
१४. मार्टिन् ल्यूथर किंग ५९
१५. ऋणानुबंध ६३
१६. मोराचे पीस ६८
१७. गुरुनानक ७१
१८. प्लास्टिक ७६
१९. शिल्पसौंदर्य ८०
२०. सेवाश्रमातील एक दिवस ८३
२१. कश्मिरातील वसंत ८८
२२. कविभूषण ९३
२३. जिकडे धर्म तिकडे जय! ९८
२४. आई १०३
२५. पांढऱ्यावरची लाल फुली ११०
२६. अक्का ११४
२७. इर्जिक १२०
२८. गांधीदर्शन १२७
२९. विचारधन १३१

कविता

१. आनंदी-आनंद गडे! १३५
२. या झोपडीत माझ्या १३७
३. आला क्षण—गेला क्षण! १३९
४. शतकानंतर १४१
५. थांब जरासा बाळ! १४३
६. अम्ही तर जंगलची पाखरे १४५
७. संताजीची घोडदौड १४७
८. आता उजाडेल! १५०
९. शिशिर ऋतूचं गान १५२
१०. उघड उघड पाकळी! १५४
११. कोकिळ १५६
१२. उगवला नारायण १५८
१३. अनामिकास १६०
१४. सुभद्रेचा शोक १६१
१५. माझ्या जन्मभूमीचे नाव १६३
१६. अभंगवाणी १६५



.१.

# माझे बालपण

बाबा आमटे

बाबा आमटे (जन्म : १९१४). हे कळकळीचे कार्यकर्ते, त्यागी समाजसेवक व लेखक आहेत. विदर्भातील वरोडा येथे त्यांनी 'आनंदवन' नावाची कुष्ठरोग्यांची वसाहत वसवून समाजसेवेचा एक आदर्श घालून दिला आहे.

त्यांनी आपल्या बालपणच्या काही आठवणी या पाठात सांगितल्या आहेत.

मी जेव्हा तुमच्याएवढा छोटा होतो ना, तेव्हा मी एक दिवस खरेच पैशाचे झाड लावले ! जमिनीत पैसा पुरला आणि वाट पाहात बसलो. केव्हा एकदा पैशाचे झाड उगवते आणि खूप पैसे मिळतात असे मला झाले होते. बरेच दिवस निघून गेले; पण पैशाचे झाड उगवलेच नाही. मी रडू लागलो. आईला ही गोष्ट कळली. मग तिने मला पैशाची झाडे कशी लावली जातात, हे नीट समजावून सांगितले.

लिंबू, संत्री, आंबे ही झाडे लावावीत, गव्हाचे पीक काढावे आणि मग त्या सुंदर पिकांनी धन प्राप्त होते, असे सांगून आई म्हणाली, "बाळ, माती आणि मेहनत या दोन्हींवर श्रद्धा ठेवली म्हणजे झाड उगवेल आणि मग पैसा आपोआप तुझ्या खिशात येईल."

माझी आई काही विशेष शिकलेली नव्हती; पण ती एक उत्तम शिक्षिका होती. कठीण विषय ती मला अगदी सहज समजावून सांगे. मला एक गोष्ट आठवते. एकदा माझ्या आईने मला एक जपानी बाहुली दिली. बाहुली पाडली की लगेच तावडतोब ती उठून उभी राहायची ! शेवटी तिला पाडणाराच थकून जायचा ! मला आईने ही बाहुली दिली व ती म्हणाली, "बाळ, जीवन असंच आहे—आपल्याला एकसारखी आपटी खावी लागते. मी कधीच पडणार नाही, पराभूत होणार नाही, आपटणार नाही अशी फुशारकी मारून चालणार नाही. पराभूत न होण्यात, खाली न पडण्यात मोठेपणा आहे असं नव्हे; तर पराभव झेलून पुन्हा ताठ खडे राहण्यातच खरी मजा आहे ! खरं शौर्य आहे ! पराभवाच्या तडाख्यानं खचून न जाणं हेच खरं जीवन आहे !"

लहानपणी मी माझ्या दोस्तांवर खूप रुसत असे ! आम्ही एकमेकांवर अतिशय प्रेम

करत असू! गट्टी फू करत असू. दोन दोन वर्षे आमचा अबोला चालू असे. पुन्हा मनात ही घमेंड, की मी नाही आधी बोलायला लागणार. दोस्तांशी हितगुज करण्याचे



विचार मनात नुसते उंचबळून येतात. पण तोंड बंद! हे असे किती दिवस चालायचे! एक दिवस आईने माझी ही अवस्था पाहिली. तिने मला एक झाड दाखवले व ती म्हणाली, "बघ, या झाडाची सारी जुनी पिकलेली पानं गळून गेली आहेत. आपले जुने द्वेष, मत्सर, कलह असे सोडून दिले पाहिजेत. सडलेली, पिकलेली पानं झाड फेकून देतं. आपणही आपापसांतील द्वेष, मत्सर असाच फेकून दिला पाहिजे."

आईच्या या बोलण्याचा माझ्या मनावर फार परिणाम झाला. यानंतर आमचे अनेक रुसवे, फुगवे, भांडणे झाली; पण ती मिटलीही तावडतोब.

एकदा माझ्यावर मोठा भयंकर प्रसंग आला. नेहमीप्रमाणे आम्ही मित्र गुपचूप एका आंबराईत घुसलो आणि दगड मारून आंबे पाडायला लागलो. तेव्हा लांब लांब मिशावाला रखवालदार सोटा घेऊन आमच्याकडे धावला. भय्याला पाहताच माझ्या साऱ्या मित्रांनी धूम ठोकली. पण मी आंबे चोरण्याच्या आनंदात पूर्ण बुडून गेलो होतो. भय्याने मला एकदम पकडले.

"चल, हे सारे आंबे झाडाला लावून टाक!" माझे मनगट पकडून भय्या गुरगुरला. मोठाच कठीण प्रसंग आला. आंबे झाडाला कसे लावायचे? स्वतःची सुटका करून घेण्यासाठी मी भय्याची खूप विनवणी केली, रडलो, वडलांचे नाव सांगितले, लाच द्यायला तयार झालो; परंतु त्याचे आपले एकच म्हणणे-"आंबे झाडाला लावून दे!"

पाचसहा तास त्याने मला अडकवून ठेवले, तेव्हा मग कुठे माझी सुटका केली! आता त्या रखवालदार भय्याचे मला मोठे कौतुक वाटते.

जादुगाराचा खेळ मला फार आवडायचा. पण मी केवळ प्रेक्षकाची भूमिका घेत नव्हतो. डोंबाऱ्याने प्रेक्षकांतून एखादया छोकऱ्याला पुकारले, की मी उडया मारत धावत जाई! यात मला मोठा पराक्रम वाटे. त्याचे ते सवालजबाब, ते भयंकर आवाज, डमरूची डमडम, प्रेक्षकांचे खदखदून हसणे-हे सारे मोठे रोमांचकारी होते. जादुगार माझ्या पाटलोणीच्या खिशातून रुपये काढायचा आणि आपल्या डब्यात खणखण वाजवत टाकायचा. पैशाचा असा पाऊस पाडणारा जादुगार मला प्रत्यक्ष देवदूतच वाटला. परंतु एका प्रश्नाचे उत्तर मला सापडले नाही. पैसा निर्माण करण्याची इतकी अचाट शक्ती असणाऱ्या माणसाने लोकांपुढे एकेक पैशासाठी हात का पसरावेत? आईने मला सांगितले, "बाळ, जादूनं पैसे निर्माण होत नाहीत. ही सर्व हातचलाखी." पण ती तरी कशी करायची? ते शोधण्यासाठी मी जादूची पुस्तके वाचली. त्यांमध्ये अदृश्य होण्याची एक किमया सांगितली होती. जालियनवाला बाग आणि भगतसिंग यांची चर्चा आमच्या मित्रमंडळात चालायची. माझ्या काही मित्रांना जमवून मी किशोर-क्रांतिकारकांचे गुप्त मंडळ स्थापन केले होते. अदृश्य होण्याचा हा मार्ग मला फार पसंत पडला. या जादूने भगतसिंगासारख्या प्रिय नेत्यालाही वाचवता येईल! उपाय असा होता—अमावास्येच्या रात्री एक काळे मांजर मारून त्याचे चामडे तयार करायचे व ते जवळ ठेवायचे. त्याप्रमाणे मी केले. परंतु हे चामडे जवळ ठेवल्यावर कोणीच अदृश्य होऊ शकला नाही. आम्ही खूप निराश झालो.

बालपणच्या आठवणींतील परम क्षण म्हणजे मी गुरूचा आदेश मानून स्वतःला

विहिरीत झोकून दिले तोच! आमचे शिक्षक शालेय विषयांबरोबर आम्हांला ज्वलंत देशभक्तीचे आणि उज्ज्वल चारित्र्याचे पाठ देत असत. देशभक्त कोण होऊ शकतो? ज्याच्याजवळ ताकद, हिंमत आणि समर्पणाची भावना आहे तोच!

एकदा ते आम्हांला शहराबाहेर दाट आंबराईत एका विहिरीजवळ घेऊन गेले. अंधारी रात्र होती. त्यांनी मला विहिरीच्या काठावर उभे केले व म्हटले, "चल, मार उडी!"

खाली काळाकुट्ट अंधार होता. मी दोनदा खाली वाकलो आणि तसाच थबकलो. मनात भयाची लढाई चालू होती. एकदा वाटत होते, मागे फिरावे! पण एक क्षण असा आला—मी सगळ्यावर मात केली. गुरुजींनी तिसऱ्यांदा खाली उडी मारण्याचा आदेश दिला आणि त्याच क्षणी मी धाडकन स्वतःला त्या खोल अंधारात झोकून दिले.

त्या अविस्मरणीय क्षणाने मला जीवनभर पुरेल इतका आत्मविश्वास माझ्या ठिकाणी निर्माण केला.



**अभ्यास :**

१. बाबा आमटे यांनी सांगितलेल्या आठवणींपैकी तुम्हांला कोणती आठवण विशेष आवडली? का?
२. देशभक्त होण्यासाठी कोणत्या गुणांची आवश्यकता असते?
३. 'पराभव झाला तरी त्या पराभवाच्या तडाख्यानं खचून न जाणं हेच खरं जीवन होय!' अशी मार्गदर्शक वाक्ये या पाठात आणखी आहेत. ती शोधून काढा व टिपून ठेवा.
४. रखवालदाराच्या तावडीत सापडल्यानंतर त्या दोघांचे काय बोलणे झाले असेल याची कल्पना करून एक लहानसा संवाद लिहा.



.२.

# गावचा ओढा

व्यंकटेश माडगूळकर

व्यंकटेश माडगूळकर (जन्म : १९२७.) यांनी कथा, कादंबरी, नाटक इत्यादी विविध प्रकारचे लेखन केले आहे. त्यांची 'माणदेशी माणसे', 'गावाकडच्या गोष्टी', 'घरदार', 'बनगरवाडी' ही व इतर अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. पुढील पाठ त्यांच्या 'घरदार' या पुस्तकातून घेतला आहे.

आपल्या गावच्या ओढयाचे चित्रण त्यांनी किती आपुलकीने केले आहे, ते पाहा.

पावसाळा साधून गावी निघालो तेव्हा प्रवासातच अशी इच्छा झाली, की गावचा ओढा आता भरून वाहात असेल; निर्मळ धारेत बसून अंघोळ करावी.

आजारी माणसाला जशी काहीबाही खाण्याची वासना होते, तसेच हे होते. मी काही गावाला फार वर्षांनी जात होतो अशातला प्रकार नव्हता. वर्षादोनवर्षांनी एखादी धावती भेट होतेच, नाही असे नाही. पण गेल्या अनेक वर्षांत गावच्या ओढयात मी अंघोळ केली नव्हती. निर्मळ धारेत माशासारखे पोहून जवळ जवळ तप लोटले होते.

जो जो आठवण करू लागलो तो तो लहान लहान तपशीलही आठवू लागले आणि धारेत अंघोळ करण्याची इच्छा अनावर झाली. माशांची रुपेरी अंगे पायांच्या तळव्यांना गुदगुल्या करू लागली. ओढयाकाठच्या वनस्पतींचा थंड वास छाती भरून टाकू लागला. ओढयात स्नान करण्याची इच्छा फारच अनावर झाली.

काही गावांच्या ओढयांना छान नावे असतात. 'कापूर ओढा', 'भाकर ओढा', 'लांडोर ओढा' अशी काही नावे मला आता आठवतात. आमच्या ओढयाला असे काही नाव नाही. त्याचे नाव कुणी ठेवलेच नाही. ही एक उणीव राहून गेली आहे खरी. उगीच आपला ओढा म्हणून गुणच तेवढा सांगण्यात मतलब नाही. आमच्या ओढयाचे पात्रही रुंद नाही.

गावापासून दोन-अडीच मैलांवर असलेल्या पाटलाच्या तालीत त्याचा जन्म झालेला आहे. ताल मोठी आहे. पाटलाने आपल्या रानात डोंगराएवढी ताल टाकली आहे, असे लोक अपूर्वाईने बोलतात. तालीतून जन्म घेणाऱ्या या ओढयाला आजूबाजूच्या लहान

ओहळा-नाल्यांनी मोठेपणा दिला आहे. काळ्या रानातून, तांबड्या रानातून, माळरानातून मिळवलेली जलसंपत्ती या सगळ्या मंडळींनी उदार मनाने ओढ्याला दिली आहे. भाद्रपदाच्या महिन्यात दणक्या पाऊस झाला, की पाटलाची ताल तुडुंब भरे आणि मातीत रंगून तांबडालाल झालेला पाण्याचा लोंढा वाळूत झिरपत, वाळूला पुढे लोटत धावू लागे.

ओढ्यात अंघोळ करायची इच्छा मी पुरी तर करणार होतोच; पण गावालगतच्या पाणवठ्याऐवजी मी ऐन दुपारी पांढऱ्या खडकावर जाऊन कपडेही धुणार होतो. स्वतःचे कपडे स्वतःच्या हातांनी धुऊनही मला फार दिवस झाले होते. गावात पोचलो की पहिली अंघोळ पांढऱ्या खडकावर जाऊन करायची, हा बेतही मी मनाशी पक्का करून टाकला!

स्वच्छ धारेतल्या थंड पाण्यात पडून कितीतरी वर्षे लोटली! आता गावी गेल्यागेल्या पहिली अंघोळ पांढऱ्या खडकाजवळच्या ओढ्यात करायची. अंगावरचे कपडे आपल्या हाताने पांढरेफेक धुऊन उन्हात कडक वाळवायचे! ओल्या वाळूत लहान झरा काढून त्याचे पाणी ओंजळीने प्यायचे. उंबराची उंबरे खायची; पिंपळाची पिंपरे खायची. पिंपरणीच्या पानाची पिपाणी करून वाजवायची. शेवाळाखालचे मासे हाताच्या चंबूत धरता येतात का हे पाहायचे!

गावात पोचलो आणि सकाळी उठल्याउठल्या आईला म्हटले, "मी आज अंघोळीला ओढ्याला जातो; पाणी नको तापवूस! ओढ्यात अंघोळ करून फार दिवस झाले."

आई म्हणाली, "ओढ्याला पाणी नाही रे बाबा. विहिरीला जा पोहायलाच जायचं तर!"

मी आश्चर्याने विचारले, "ओढ्याला पाणी नाही?"

"नाही. चिमणीला पिण्यापुरतंसुद्धा नाही."

मला या गोष्टीचे नवल वाटले. प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहावे म्हणून मी घराबाहेर पडलो. ओढ्याकडे आलो. काठावर उभा राहून ओढ्याकडे पाहिले आणि पूर्वी सुस्थितीत पाहिलेल्या मित्राला दहाबारा वर्षांनी दुःस्थितीत पाहिल्यावर जसे वाटावे तसे मला वाटले! दृष्टीच्या टप्प्यात येत होता तेवढा सगळा ओढा कोरडा ठणठणीत होता. पलीकडे असलेल्या टाकाऊ रानातील माती वाहून येऊन बसली होती आणि ओढ्याचे पात्र अगदीच रोडावले होते. दोन्ही काठची निर्गुडी-तरवडाची, बाभळी-करंजाची झाडे कुठच्या कुठे नाहीशी झाली होती. दोन्ही काठ रखरखीत दिसत होते. पाणवठ्यावरचा तो औदुंबर कुठे दिसत नव्हता. तो अश्वत्थवृक्षसुद्धा आता अगदी

रोडावला होता. काळी माती बसून कठीण झालेल्या ओढ्यातून चालत चालत मी पार पांढऱ्या खडकापर्यंत गेलो. पुन्हा परत येऊन खाली पार महारवाड्यापर्यंत गेलो आणि उदास मनाने माघारी येऊन ओढ्याऐवजी घरच्या आडावर अंघोळ केली.

"आई, खरंच की ग, ओढ्याला पाणी नाही. पाणी नाही ते नाही, काठावरची झाडीही नाही!"

"बाबा रे, अलीकडं माणसं लबाड झालीयत. देवधर्म, कुळाचार पाळीनाशी झालीयत. पाऊस गेला."

"पाऊस अजिबात गेला?"

"पडतो, पण पूर्वीसारखा नाही."

"पण आई, झाडं ग कुठं गेली?"

"तोडली लोकांनी. निर्गुड्या-बाभळी लोकांनी जळणासाठी तोडल्या. सरपणाची फार बानवा बघ आपल्या गावाला. कमरेएवढं झुडूप झालं, की लोक आता त्यावर कुऱ्हाडीचा घाव घालतात. माझ्या लहानपणी किती झाडं होती गावाला! आता काही राहिलं नाही. उजाड झालं सगळं गाव!"

"उंबरसुद्धा सरपणासाठी तोडला?"

"उंबर फार जुना. व्यंकटेशा, तो वठला. वठल्यावर त्याला ठेवून काय करायचं? लोकांनी तोडून त्याचं सरपण केलं!"

"मग आता पावसाळ्यातसुद्धा ओढ्याला पाणी येत नाही?"

"येतं थोडं. लोंढा पुढं येतो आणि मागं कोरडं पडत येतं. ओढा आला म्हणून कुणी सांगावं आणि किती पाणी आलं म्हणून पाहायला जावं, तोवर पाणी आटून जातं. चार दिवससुद्धा धार राहात नाही."

माझे मन मोठे उदास झाले. कुणाचाही ऱ्हास पाहून मन उदास होतेच. त्यात माझ्या गावचा ओढा होता तो. आणि माझ्या किती रम्य स्मृती त्याच्याभोवती होत्या! त्याचे सगळे वैभव मी पाहिले होते आणि त्याची विपन्न अवस्था पाहून माझे मन उदास झाले होते.

मी जेव्हा आमच्या गावच्या प्राथमिक शाळेत शिकत होतो तेव्हा ओढ्याचे आणि माझे किती हितगुज होते! बरोबरीच्या कुणाही मुलाशी भांडण झाले, की संध्याकाळी याच ओढ्याच्या वाळूत उभा राहून मी माझ्या प्रतिस्पर्ध्याला द्वंद्वाचे आव्हान देत असे. या युद्धात कधी मी वाळू खात असे, तर कधी प्रतिस्पर्ध्याला वाळू चारत असे.

कुस्तीतील डावपेच मी याच वाळूत शिकलो. आठवड्यातून एक दिवस जो खेळाचा तास असे त्यात आम्हा मुलांचा घोळका घेऊन सोनार मास्तर याच वाळूत येत.

याच ओढ्यातील शिरगोळे गोळा करून माझ्या आईला मी स्वतः बनवलेली रांगोळी देत असे. त्या पांढऱ्याशुभ्र रांगोळीनेच आई अंगणात गोपद्मे काढत असे आणि सणासुदीच्या दिवशी तीच रांगोळी माझ्या, माझ्या भावंडांच्या पानांभोवती कमानी करत असे.

याच ओढ्याकाठच्या करंजीच्या करंज्या वेचून मी त्या गावच्या वाण्याला देत असे आणि त्याबदली मिळालेल्या चार-दोन पैशांतून चणेफुटाणे खात असे. आपल्या



स्वतःच्या कमाईचे चणेफुटाणे भावंडांना देताना मला केवढा अभिमान वाटत असे!

आणि याच ओढयाच्या वाळूत माझ्या वडलांचे दहन झाले होते. ती जागा दिसताच माझ्या मनात कशी कालवाकालव होते. वाळूत पाय रुतवून मी अजूनही कसा स्तब्ध उभा राहतो. चिरा व पणती नसलेली ही जागा माझ्या मनात कसा कल्लोळ उत्पन्न करते!

असा हा ओढा, त्याची काय ही अवस्था झाली!

"आई, गावाला ओढा नाही म्हणजे ते गाव ग कसलं! आज ओढयाकडं पाहून मला वाटलं, गावची शोभा नाहीशी झाली."

"खरं आहे रे बाबा; पण आता बुध्याळचं तळं झालं आहे. आपल्या गावाला

नळाचं पाणी मिळणार आहे. नळाचं पाणी सारखं सुटेल. जमिनी पिकतील. झाडंझुडं पुष्कळ होतील गावाला. पाच–दहा वर्षांत गाव कसं हिरवंगार होईल, भरभराटीला येईल. आमचं काय ? संपलं आता; पण तुम्हांला पाहायला मिळेल सगळं !"

घडामोडी, बदल हे होणारच. जुने नाहीसे होणार आणि त्या जागी नवे जन्म घेणार हा सृष्टीचा नियम आहे. त्याबद्दल माझी काही तक्रार नाही. पुढे येणारा हिरवा भविष्यकाळ मला सुखवतो आहे, अधीर करतो आहे. हा काळ काही फार दूर नाही. माझे डोळे उदया खचितच निवतील; त्याबद्दल मला शंका नाही. पण तूर्त तरी माझे मन उदास झाले आहे !



अभ्यास :

१. लेखकाने आपल्या गावच्या ओढयाबद्दल कोणकोणती माहिती दिली आहे ?
२. ओढयातल्या अंघोळीशिवाय आणखी कोणत्या गोष्टी करायच्या असे लेखकाने ठरवले होते ?
३. कोरडा ओढा पाहून लेखकाला काय वाटले ?
४. त्या ओढयाला पाहून लेखकाला कोणकोणत्या आठवणी झाल्या ?
५. 'जुने नाहीसे होणार आणि त्या जागी नवे जन्म घेणार हा सृष्टीचा नियम आहे', हा विचार स्पष्ट करण्यासाठी तुम्ही कोणती उदाहरणे दयाल ?
६. व्यंकटेश माडगूळकर यांचे 'घरदार' हे पुस्तक वाचा.
७. या पाठातील ओढयाचे वर्णन लक्षात घेऊन त्याचे चित्र काढा.



.३.

# आमची शिल्लक

लक्ष्मीबाई टिळक

**लक्ष्मीबाई टिळक** (जन्म : १८६८, मृत्यू : १९३६.) कवी रेव्हरंड ना. वा. टिळक यांच्या या पत्नी. 'स्मृतिचित्रे' या पुस्तकात त्यांनी आपल्या जीवनातील आठवणी लिहिल्या आहेत. पुढील उतारा 'स्मृतिचित्रे' या पुस्तकातून घेतला आहे.

पन्नास पाऊणशे वर्षांपूर्वीची ही कथा. त्या काळी लक्ष्मीबाईंनी हौशी व दया या पोरक्या मुलींना आपल्या घरी ठेवून घेतले व स्वतःच्या मुलींप्रमाणे त्यांना वाढवले. हा कथाभाग पुढील पाठात दिला आहे.

एक दिवस पाऊस पडत होता. दत्तू व हौशी आपापल्या शाळांना गेली होती. टिळक शिकवायला गेले होते. घरी मी एकटीच होते. दाराशीच काही निवडीत बसले होते.

तो दाराशी एक मुलगी भीक मागायला आली. तिचा नुसता हाडांचा सापळा राहिला होता. मुलीचे डोके पाटीएवढे, अंगात काही त्राण उरलेला नाही. डोळ्यांत प्राण आलेला आहे. अंगावर एक जीर्ण फाटके असे लज्जारक्षणापुरते हातभर कापड, हातात टिनपाट, अशी येऊन ती दारात पावसात उभी राहिली. तिच्या तोंडावर डाग दिल्याचे ताजे वण दिसत होते. प्रथम मी तिला घरात घेतले व तिची विचारपूस करू लागले.

"तुला भीक मागायला आवडतं का घरात राहायला आवडतं?"

"भीक मागायला."

"तू माझ्याजवळ राहतेस का?"

"हो."

"तुला कोणकोण आहे?"

"कोणी नाहीत. सर्वांनी मला सोडून दिलं आहे. माझं गावही फार लांब आहे."

अशा तऱ्हेने बोलणेचालणे झाल्यावर मी आपल्या मनाशी तिला ठेवून घेण्याचे ठरवले. तिला न्हाऊ घातले व हौशीचे एक लुगडे नेसायला दिले. पण एवढ्यानेच तिचे स्वरूप किती पालटले!

संध्याकाळी मुले व टिळक घरी आल्यावर ही मुलगी पाहून त्यांना कुतूहल वाटले.

"हे काय आहे?"

"हे दुष्काळाचं चित्र आहे. मी हिला घेतली."

"कशाला! आपल्याला हौशी आहे, देवानं ही तारा दिली, आणखी...."

"आणखी ही 'दया' दिली. मला हिची दया आली व देवानंही हिच्यावर दया केली."

"बरं, काही हरकत नाही."

तिचे नाव दया ठेवले.

थोडयाच वेळाने शेजारपाजारच्या कित्येक खिरस्ती बाया आमच्याकडे आल्या.

"अहो साहेब, ही मुलगी कोणाची आहे, ठाऊक आहे का?"

"नाही! का?"

"अहो, ही मांगाची आहे ना!"

"मग?"

"तुम्हांला काही नाही वाटत त्याचं?"

"काही नाही. का? आम्हांला मांग, महार, ब्राम्हण वगैरे सगळे सारखेच आहेत."

"तुम्ही आमच्याही पुढे गेलात. आम्हांला नाही चालायचं हे."

असे म्हणून त्या बाया गेल्या व पुढे कित्येक दिवस त्यांनी आमचे घर वर्ज्य केले!

टिळकांनी मात्र यापुढे घरात महार, मांग वगैरे सर्व जातींचे कामगार ठेवण्यास सुरुवात केली.

दया आल्यानंतर दुसऱ्याच दिवशी एक पोक्त वयाची मांगीण टिळकांशी भांडायला आली.

दया भीक मागत मागत ह्या म्हातारीकडे गेली होती. म्हातारीने तिला आसरा दिला. दया भीक मागून आणायची. म्हातारी तिला घरात राहू दयायची व दोघींचे पोट दयेच्या भिकेवर चालायचे.

"तिला तुमच्या घरी येऊन किती दिवस झाले?"

"आठ दिवस."

"तेवढयावर तिजवर मालकी हक्क स्थापन करतेस काय? अन् हे डाग कुणी दिले तिच्या गालांवर?"

"मला ठाऊक नाही."

"खोटं बोलतेस थेरडे! डाग दोन-तीन दिवसांचे दिसतात. खरं सांग, नाहीतर

तुला पाठवतो तुरुंगात खडी फोडायला."

हो ना करता करता ती कबूल झाली, की पोरगी भरपूर भीक आणीना, तेव्हा तिच्या गालाला उलिसंक कोलीत लावलं. मग मात्र टिळक फारच संतापले व म्हातारी पळून गेली. पुन्हा तिने कधी तोंड दाखवले नाही.

दोन्ही मुली शाळेत जाऊ लागल्या. दोघींनाही एकाच वर्गात घातले. हळूहळू त्या मराठी तिसरीत गेल्या. आम्हांला ह्या मुलींकडून काडीचाही त्रास झाला नाही. त्यांनी चोरी, लबाडी वगैरे कधीच काही केले नाही. घरात अगदी घरच्यासारख्या त्या वागत. शेण लावणे, खरकटे हात धुणे वगैरे गोष्टी न सांगता शिकल्या. चटण्या, कोशिंबिरी,



पापड, लोणची त्यांना करता येऊ लागली. स्वैपाकातसुद्धा त्या हुशार झाल्या.

पुढे पुढे दुष्काळाचे स्वरूप फारच उग्र भासू लागले. त्यातच मिशनला काही तूट आली, का काही झाले; पण त्यांनी बोर्डिंगमधून काही मुले काढून टाकली. गावात

जिकडे तिकडे खळबळ उडाली. मुलांना कुठेच काही आधार नव्हता. सुगंधराव करमरकरांनी टिळकांना ही बातमी येऊन सांगितली. टिळकांना आधी ह्याबद्दल काही माहिती नव्हती. ही बातमी ऐकून टिळकांना फारच वाईट वाटले. ते मजकडे आले व म्हणाले, "अशीच बावीस मुलं मिशननं एकाएकी आपल्या शाळेतून काढून टाकली आहेत. ती अन्नान्न करून मरतील. आता काय करायचं?"

त्या दिवशी आमच्याजवळ शिल्लक सव्वा रुपया व घरात साठवणीत सव्वाशेर ज्वारी होती. पण आमची मोठ्यात मोठी शिल्लक म्हणजे देवावरचा विश्वास. ती मात्र अगदी भरपूर होती. आम्ही दोघांनी जमिनीवर आपली मस्तके ठेवून मनोभावे परमेश्वराची प्रार्थना केली. नंतर दोघांनी एकमेकांना वचन दिले, की आपले अन्न व ह्या मुलांचे अन्न ह्यांत काहीच फरक करावयाचा नाही. जी काय ज्वारी-बाजरीची भाकरी मुलांना मिळेल तीच आपणही खायची!

दत्तूला आम्ही आमच्याजवळ बोलावून घेतला. त्याला सांगितले, "बाळ, पाहा, तुझे भाऊ आज उपाशी रानावनात फिरत आहेत. आम्ही त्यांना आपल्या घरी आणणार आहो. ते जे खातील ते तुला खावं लागेल. खाशील ना?"

दत्तू म्हणाला, "हो, मी त्यांच्याबरोबरच जेवीन, खाईन. भांडणार नाही."

आणि पुढे मुले आणल्यावर ती जाईपर्यंत ती खात तेच अन्न दत्तूने खाल्ले व आपले वचन पाळले.

---

ठलिसंक-किंचितसे, अगदी थोडे; कोलीत-पेटवलेले लाकूड; हाडाचा सापळा होणे-अंगावर मुळीच मास नसणे.

---

**अभ्यास :**

१. भीक मागायला आलेली मुलगी कशी होती? त्या मुलीबद्दल काय काय सांगितले आहे? तिचे नाव 'दया' असे का ठेवले?

२. आपली परिस्थिती चांगली नसतानाही लक्ष्मीबाईंनी दयेला आश्रय का दिला?

३. मांगीण टिळकांबरोबर का भांडायला आली? या भांडणाचा शेवट कसा झाला?

४. लक्ष्मीबाईंच्या घरात दया कशी वागत होती?

५. बोर्डिंगातील मुले टिळकांनी आपल्या घरी का आणली?

६. 'हे दुष्काळाचं चित्र आहे.' असे कोणी म्हटले? का?

७. 'पण आमची मोठ्यात मोठी शिल्लक म्हणजे देवावरचा विश्वास' असे लक्ष्मीबाईंनी का म्हटले आहे?



.४.

# फुलपाखरू

वि. स. खांडेकर

**वि. स. खांडेकर (जन्म : १८९८; मृत्यू : १९७६.) यांनी लघुकथा, लघुनिबंध, कादंबरी इत्यादी विविध प्रकारचे लेखन केले आहे. 'नवा प्रातःकाल', 'उल्का', 'मंदाकिनी' इत्यादी त्यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. भारत सरकारने त्यांना 'पद्मभूषण' ही पदवी देऊन त्यांच्या साहित्यसेवेचा गौरव केला आहे. 'फुलपाखरू' हा लघुनिबंध त्यांच्या 'मंझधार' या लघु-निबंधसंग्रहातून घेतला आहे.**

तुम्हांला जशी फुलपाखरे आवडतात, तशीच ती खांडेकरांनाही आवडतात; नव्हे. स्वतःचा मोठेपणा विसरून तेही फुलपाखराला पकडण्यासाठी त्याच्या मागे धावत सुटतात, हे वाचून तुम्हांला मौज वाटेल.

आज सकाळी एक चमत्कार घडला. मी एकदम पाच–सहा वर्षांचा लहान मुलगा झालो.

आयुष्यात असे काही क्षण येतात, की त्या वेळी प्रौढ मनुष्याला बाळपणाची धुंदी चढते. आज सकाळी माझे तसेच झाले. अकरा वाजता एका संस्थेच्या कार्यकारी मंडळाची सभा आटपून मी घराकडे वळलो. अंगणात जे पहिले पाऊल टाकले ते तिथेच खिळून राहिले. माझ्या स्वागताकरता एक फुलपाखरू तिथे भिरभिरत नृत्य करत होते. जणू काही पुष्पसृष्टीतले चिमुकले विमानच! त्याचे ते चिमणे पोपटी पंख, त्या पंखांवरले ते इवले-इवले काळे ठिपके आणि या दोन रंगांना उठाव देणाऱ्या त्याच्या शरीरावरच्या अनेक रंगांच्या छटा पाहून मी थक्क झालो. जवाहिऱ्याच्या दुकानात दिसणाऱ्या दागिन्यांकडे मी आजपर्यंत कधीच निरखून पाहिले नाही. पण या फुलपाखराचे ते अद्भुत सौंदर्य मी अधिऱ्या डोळ्यांनी टिपत होतो, माझ्या मनात लपवून ठेवत होतो. पण पुढल्याच क्षणी रातराणीच्या सुगंधाप्रमाणे ते अचानक गुप्त होत होते.

त्या चिमण्या फुलपाखराचे रंग पाहून मला वाटले, जिच्यावर इंद्रधनुष्याची तोरणे उभारलेली आहेत, जिच्या घाटाच्या पायऱ्या कुबेराच्या भांडारातल्या नवरत्नांनी

घडवलेल्या आहेत अशा कुठल्यातरी स्वर्गीय नदीच्या परिसरात या फुलपाखराचा जन्म झाला असावा !

आमच्या अंगणात येऊन ते का खेळत आहे, हेच मला कळेना. तशी काही आमच्या घराभोवती बाग नाही किंवा सुंदर फुले नाहीत. त्याला आकर्षण वाटावे असे इथे काहीच नाही. तरीही ते वेडे स्वतःभोवती सर्कशीतल्या मृत्युगोलात मोटार-सायकल फिरवणाऱ्या साहसी खेळाडूप्रमाणे पुन्हा पुन्हा वळत आणि फिरत राहिले आहे.

त्याच्याकडे पाहता पाहता मी भान विसरून गेलो. त्याला धरण्यासाठी त्याचा पाठलाग करू लागलो. अंगण उघडे आहे आणि रस्त्यावरून जाणारी–येणारी माणसे फुलपाखरू पकडण्याचा प्रयत्न करणाऱ्या एका वयस्क माणसाकडे पाहून हसत आहेत याची मला कल्पनाच नव्हती. त्या फुलपाखराला पाहिल्यापासून मी एका नव्या जगात प्रवेश केला होता. तिथे फक्त आम्ही दोघेच होतो. ते फुलपाखरू अनेकदा माझ्या इतके जवळ आले, की मी त्याला सहज पकडू शकलो असतो. पण माझा हात ज्या क्षणी पुढे होई त्या क्षणी ते दूर गेलेले असे. ते हुलहुल करीत जणू काही माझ्या हद्दीत येत होते आणि मला हुलकावण्या दाखवून पुन्हा सुरक्षितपणे आपल्या हद्दीत परत जात होते.

त्याने किती वेळा मला अशा गोड हुलकावण्या दिल्या याची गणतीच करता येणार नाही.

त्याला सोडून मला घरात जाववेना. मी त्याच्याकडे पाहात उभा राहिलो आणि कुठल्या क्षणी ते भुर्रकन दूर गेले तेही मला कळले नाही ! गाण्याची एखादी अतिमधुर लकेर कानावर पडावी आणि लगेच विरून जावी तसे मला झाले !

ते फुलपाखरू मी पाहिल्याला आता बारा तास झाले आहेत. रात्रीचे अकरा वाजले आहेत. दिवसा एखादया अवखळ पोराप्रमाणे हुंदडणारे हे घर शांतपणे झोपी गेले आहे. ते नाना प्रकारची स्वप्ने पाहात आहे. पण मी मात्र माझ्या अंथरुणावर या कुशीवरून त्या कुशीवर वळत पडलो आहे. खिडकीतून आलेल्या चांदण्याने माझ्या उशीला नवा सुंदर जाळीदार अभ्रा चढवला आहे. पण त्याचे सौंदर्य मला मोहवू शकत नाही. मला राहून राहून त्या फुलपाखराची आठवण होत आहे.

ते या वेळी कुठे असेल ? दमून झोपले असेल ? फुलपाखरे झोप कशी घेतात ? कुठे घेतात ? मला जशी त्याची आठवण होत आहे, तशी त्याला माझी आठवण होत असेल का ? ते कधी मला दिसेल का ? दिसले तर तेच हे फुलपाखरू म्हणून मला ओळखता येईल का ? या विशाल विश्वात कुठेतरी त्याचा जन्म झाला; कुठेतरी माझा झाला ! आज दुपारी योगायोगाने आमची दोघांची भेट झाली. पण ती पुन्हा कधी होईल का ?

ती होवो अथवा न होवो, त्या फुलपाखराला मी कधीही विसरू शकणार नाही. ते जागेपणी मला दिसणार नाही; पण ते निश्चित माझ्या स्वप्नात येईल.

मनुष्य स्वप्नांवर जगतो तो काय उगीच !

जवाहिऱ्या – रत्नांचा व्यापार करणारा; कुबेर – इंद्राचा खजिनदार; परिसर – भोवतालची जागा, प्रदेश.

अभ्यास :

१. फुलपाखराला चिमुकले विमान का म्हटले आहे ?
२. स्वर्गीय नदीच्या परिसरात फुलपाखराचा जन्म झाला असावा, असे लेखकास का वाटते ?
३. 'मनुष्य स्वप्नांवर जगतो तो काय उगीच !' – असे लेखक का म्हणतो ?
४. फुलपाखरू लेखकाच्या स्वप्नात आले अशी कल्पना करून त्या दोहोंमधील संवाद लिहा.





# सुकेशिनी

.५.

भा. श्री. परांजपे

प्रा. भा. श्री. परांजपे (जन्म : १९१४.) हे नागपूर येथे मराठीचे प्राध्यापक आहेत. 'वसंताच्या खुणा' हा त्यांचा कथासंग्रह प्रसिद्ध आहे.

भिक्षूंना उपास पडतात हे पाहून सुकेशिनीचे अंतःकरण कळवळले. त्यांना पोटभर जेवता यावे यासाठी सुकेशिनीने कसा त्याग केला, ते या कथेत वाचा.

त्या मुलीचे खरे नाव सुकेशिनी नव्हे. तिचे नाव होते नंदिनी. पण लोक तिला 'सुकेशिनी' म्हणत. तिलाही ते नाव फार आवडे.

लोक तरी काय तिला उगीच सुकेशिनी म्हणत नव्हते. तिचे केस होतेच तसे सुंदर, लांबसडक आणि पिंगट रंगाचे. ते केस तिच्या पाठीवर कंबरेपर्यंत रुळत असत आणि त्यावर उन्हाची किरणे पडली म्हणजे चमचम करीत. ती वेणी कधीच घालत नसे, तर उलट ते केस तसेच पाठीवर मोकळे सोडून चालणे तिला फार आवडे; आणि खरे सांगायचे तर ते तिला शोभूनही दिसे.

बिचारी सुकेशिनी! तिचे आईबाप तिच्या लहानपणीच वारले होते. घरात एका म्हाताऱ्या आजीशिवाय मायेचे दुसरे माणूस नव्हते. तिचे वडील एके काळी फार श्रीमंत होते. तसेच ते दयाळू होते. त्यांच्या दानधर्माची कीर्ती कितीतरी दूरपर्यंत पसरली होती; पण त्यांच्या या दयाळूपणामुळेच त्यांना आपल्या मुलीसाठी मात्र काहीच पैसा शिल्लक ठेवता आला नव्हता. नाही म्हणायला सुकेशिनीला एक मोठी देणगी त्यांच्याकडून मिळाली होती—ती म्हणजे मनाचा दयाळूपणा. सुकेशिनी गरीब होती, तितकीच दयाळूही होती. ती कुणाचे शिवण करी; तर कुणाचे टिपण-कशिदयाचे काम करी. वस्त्र विणून ते विकायला नेई. आजीच्या नकळत पहाटे उठून एखादया घरचे दळणही उरकून येई. झाडाला पाणी घालायचे काम तीच करी आणि नदीवर पाणी आणायलाही तीच जाई. एखादे गरिबाचे मूल धावता धावता रस्त्यात पडले तर हातातली घागर बाजूला ठेवून ती धावत जाई व त्याला उचलून घेई. दोन

गोड शब्द बोलून त्याचे रडे थांबवणारी जर कुणी असेल तर ती सुकेशिनीच. अशा गोड व दयाळू स्वभावाची सुकेशिनी सर्वांची फार आवडती होती. त्या सर्वांचा तिच्यावर तसाच लोभ होता. पण हो, एक सांगायचे राहिले. त्या गावात एक व्यक्ती अशी होती, की जिला सुकेशिनीचे हे कौतुक पाहवत नसे.

त्या मुलीचे नाव होते केशिनी.

ती एका श्रीमंत सावकाराची मुलगी होती. तिच्या अंगावर सोन्याचे व हिऱ्याचे पुष्कळ दागिने होते. ती मोठी गर्विष्ठ मुलगी होती. त्यामुळे तिच्याशी फारसे कुणी बोलत नसत. या केशिनीचे केस अगदी छोटे होते. मुली तिची नेहमी चेष्टा करीत व म्हणत, "तू आहेस नुसती केशिनी अन् ही आहे सुकेशिनी." केशिनीला सुकेशिनीचा राग येई तो यामुळेच.

पण एके दिवशी नदीच्या काठावर सुकेशिनी आली तेव्हा केशिनीने तिलाच हाक मारली, "अग ए नंदिनी...."

केशिनी नेहमीच सुकेशिनीला 'नंदिनी' या नावाने हाक मारत असे. 'सुकेशिनी' या नावाने हाक मारणे तिला आवडत नसे. सुकेशिनी हसली व म्हणाली, "मी सुकेशिनी आहे बरं का!" असे म्हणता म्हणता तिने आपल्या मऊ मऊ केसांवरून बोटे फिरवली.

केशिनीला वाटले, सुकेशिनी म्हणते आहे, "बघ, किती छान केस आहेत माझे! नाही तर तुझे आहेत का इतके लांब अन मऊ?"

आता त्यांवर सूर्याचे किरण पडले होते. त्यामुळे तर ते अधिकच सुंदर दिसत होते.

केशिनीला त्या केसांचा हेवा वाटला. कितीतरी वेळ ती त्या केसांकडे पाहात राहिली. काही वेळाने ती काहीशा आर्जवाने म्हणाली, "सुकेशिनी, मला देतेस का हे केस? मी तुला त्याबद्दल पैसे देईन. आई म्हणत होती, की सुकेशिनीला पैसे हवेच असतील; कारण सुकेशिनी गरिबाची पोर आहे."

पाहिलेत ना, केशिनीला आपल्या श्रीमंतीचा केवढा गर्व होता तो! सुकेशिनीला अर्थातच तिच्या या बोलण्याचा मनातल्या मनात राग आला; पण तिने तो दाखवला नाही. मान वळवून दुसरीकडे पाहिल्यासारखे करत ती म्हणाली, "ऊं, इथं हवे आहेत कुणाला तुझे पैसे?" असे म्हणून तिने आपली घागर घेतली व ती घराकडे जायला निघाली.

घरी जाता जाता ती आंबराईच्या रस्त्याने निघाली. परवापासून त्या आंबराईत भगवी वस्त्रे नेसलेला संन्याशांचा जमाव दिसत होता. तो अद्यापि तसाच तळ

ठोकून बसलेला होता; पण त्यांची तोंडे किती सुकल्यासारखी दिसत होती! काल त्या संन्याशांना गावात भिक्षा मागत हिंडताना सुकेशिनीने पाहिले होते. मग त्यांची तोंडे आज अशी सुकल्यासारखी का? त्यांना गावात भिक्षा मिळाली नाही की काय? हा विचार मनात येताच ती दयाळू मनाची सुकेशिनी विषण्ण झाली. आपल्या गावात संन्यासी यावे आणि त्यांना खाण्यापुरते अन्न मिळू नये, ही गोष्ट सुकेशिनीला लाजिरवाणी वाटली. ती आजीजवळ जाऊन म्हणाली, "आजी, मघा आंबराईतून परत येताना मला कालचे ते संन्यासी दिसले. त्यांना आज दोन दिवस झाले, जेवायलासुद्धा मिळालेलं दिसत नाही. आपल्या गावात असं कुणी येऊन उपाशी राहावं, हे किती वाईट आहे, नाही?"

आजी म्हणाली, "हो, पण गावातल्या साऱ्याच लोकांनी नको का असा विचार करायला?"

सुकेशिनी म्हणाली, "का बरं? त्यांनी नाही केला म्हणून आपल्याला नको का करायला?"

"पण आपल्याजवळ इतके पैसे तरी कुठं आहेत?" आजी म्हणाली.

सुकेशिनीला केशिनीच्या म्हणण्याची आठवण झाली आणि ती हसून म्हणाली, "का बरं, पैसे न मिळायला काय झालं? मनात आणलं तर तेही मिळतील. सांगू कसं ते? हे बघ, माझे केस केशिनी मागत होती. पैसेसुद्धा देईन म्हणाली. मग देऊ का केस? आणू का पैसे?"

आजी काही बोलली नाही. ती नुसतीच सुकेशिनीकडे विस्मयाने पाहात राहिली. पण आजीला कसे खूष करावे हे सुकेशिनीला चांगले माहीत होते. तिने आजीच्या गळ्याला प्रेमाने विळखा घातला आणि आर्जवाच्या स्वरात म्हटले, "बोल ना ग आजी. सांग ना, मी यात काही वाईट का सुचवते आहे? माझे केस काय, गेले तसे पुन्हा येतील; पण असलं पुण्याचं काम करायची संधी पुन्हा मिळायची नाही. बाबा तर नेहमी म्हणत, 'धन काय पुन्हा मिळेल, पण पुण्य करण्याची संधी पुन्हा मिळत नाही.'...."

आजी काहीशी हसली व सद्‍गदित होऊन म्हणाली, "तू तरी आपल्या बापाचीच लेक आहेस की! मी नाही म्हटलं म्हणून माझं थोडंच ऐकणार आहेस? त्यानं घरात होतं नव्हतं ते सारं दान केलं अन् तूही आता आपले केस विकायला निघालीस!"

आजीची कशीबशी का होईना, संमती मिळाली हे पाहून सुकेशिनीला फार आनंद झाला. त्या आनंदाच्या भरात आपला सुंदर केशसंभार केव्हा काढला गेला, ते तिला

कळ्लेसुद्धा नाही. सुकेशिनी आपले केस घेऊन धावत धावत केशिनीकडे गेली पण केशिनीला गर्व चढला. ती म्हणाली, "मला नकोत हे केस."

केशिनीच्या आईने मात्र ते ठेवून घेतले व सुकेशिनीला पैसे दिले.

काही वेळाने सुकेशिनीच्या आजीने खीर बनवली व त्या दोघीजणी ते खिरीचे भांडे घेऊन आंबराईत गेल्या. पाहतात तो काय, संन्याशांचा जमाव आता जायच्या तयारीत दिसत होता.

काय करावे सुकेशिनीला सुचेना. तिच्या ओठातून एक हुंदका मात्र बाहेर पडला.



त्यांतल्या एका संन्याशाने तो ऐकला. तो थांबला. जवळ येऊन त्याने तिला विचारले, "बाळ, का रडतेस ?"

आजी म्हणाली, "भुकेल्या पोटी जायला निघालात म्हणून तिला रडू आलं आहे. हे बघा, हिनं तुमच्यासाठी मुद्दाम एवढी खीर करून आणली आहे." असे म्हणून आजीने केस काढल्यापासूनची सारी गोष्ट त्या संन्याशाला सांगितली.

तो संन्यासी कोण होता ? सर्वसंगपरित्याग करून संन्यासी झालेले भगवान गौतम बुद्ध होते ते ! आपल्या शिष्यांसह ते राजगृहाला चालले होते; परंतु मध्यंतरी काही आजारामुळे ते सारे जण दोन दिवस त्या गावच्या आंबराईत उतरले होते. दोन दिवस ते गावात हिंडले; पण त्यांना भिक्षा मिळाली नव्हती. गावातल्या लोकांनी त्यांची चौकशीसुद्धा केली नव्हती. आणि आता ही दहाबारा वर्षांची मुलगी आपल्या गावाला लागलेला हा कलंक पुसून टाकण्यासाठी आपले केस विकून या भिक्षुकांसाठी जेवण घेऊन आली होती. स्वतःचे केस विकून क्षुधितांना अन्न देण्याच्या तळमळीने स्वतःचे सुंदर केस कापून घेणारी ती दयाळू मनाची पोर ! तिला पाहून भगवान बुद्ध अत्यंत संतुष्ट झाले. त्यांनी तिला प्रेमाने जवळ घेऊन तिची पाठ थोपटली आणि म्हटले, "सुकेशिनी, तू खरोखरच सुकेशिनी आहेस."

बोलता बोलता भगवान बुद्धांनी तिच्या मस्तकावरून प्रेमाने हात फिरवला.

आणि असे म्हणतात; की भगवान बुद्धाच्या नुसत्या हस्तस्पर्शाबरोबर सुकेशिनीच्या मस्तकावरून केस पुन्हा खळखळत्या जलधारेसारखे धावत कमरेपर्यंत खाली आले. तेच ते लांबसडक आणि पिंगट वर्णाचे केस !

**अभ्यास :**

१. केशिनी व सुकेशिनी यांच्यात कोणता फरक होता ?
२. सुकेशिनी स्वतःचे सुंदर केस विकायला का तयार झाली ? त्यासाठी तिने आजीचे मन कसे वळवले ?
३. सुकेशिनी व तिची आजी आंबराईत गेल्यावर कोणकोणत्या गोष्टी घडल्या ?
४. नंदिनीला सुकेशिनी का म्हणत ? तिला नंदिनी म्हणून हाक मारणारी कोणती व्यक्ती होती ?
५. 'तू तरी आपल्या बापाचीच लेक आहेस की.'—हे कोण म्हणाले ? कोणाला ? का ?
६. सुकेशिनीच्या स्वभावाबद्दल पाचसहा ओळी लिहा.





.६.

# सुपारीबागेची सहल

श्री. ना. पेंडसे

श्री. ना. पेंडसे (जन्म : १९१६.) हे प्रामुख्याने कादंबरीकार असले तरी यांनी काही कथा व नाटकेही लिहिली आहेत. यांच्या लेखनात कोकणातील जीवनाचे प्रतिबिंब उमटलेले आढळते. त्यांच्या 'एल्गार', 'हद्दपार', 'हत्या' या व आणखी काही कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. पुढील उतारा त्यांच्या 'हद्दपार' या कादंबरीतून घेतला आहे.

सहलीस जायचे म्हणताच तुमची कोण धांदल व गडबड उडून जाते याचा तुम्हांला अनुभव आहे. शाळेतील मुलांच्या अशाच एका सहलीचे वर्णन या पाठात केले आहे.

दुर्गेश्वराच्या आसमंतात अनेक रम्य स्थळे आहेत; पण पिकते तिथे विकत नाही. पुण्यामुंबईकडील पाहुणा दुर्गेश्वराचे तीन मैल लांबीचे वाळवंट पाहून थक्क होतो. श्रीकेशवराज येथील निसर्गाचे रम्य, भव्य स्वरूप पाहून आदराने नम्र बनतो; पण दुर्गेश्वराला याची दाद नाही.

तांबडीचा गोंड नि भैरीचा कोंड यांच्या बरोबर मध्ये सर्वांत उंच टेकाडावर सुपारी-बाग आहे. सुपारीबाग म्हणजे दुर्गेश्वराची मिजास आहे. हर्णेचा भुईकोट किल्ला, पलीकडचा जंजिरा आणि बत्ती यांविषयी तिथल्या पंचक्रोशीला वाटणारे आकर्षण अलोट असते. ही तीनही स्थळे जवळ जवळ आहेत आणि समभुजत्रिकोणाचे बिंदू शोभावेत अशी त्यांची स्थाने आहेत. इथे जायचे म्हणजे कस्टम ऑफिसरची परवानगी लागते. ही यातायात कोणी करावी? मोठी माणसेसुद्धा इकडे क्वचितच फिरकतात. पण लहान मुलांना कोण नेणार?.....नेणार! आमचे मास्तर नेणार! दापोलीचे गॅडनीचे चर्चही असेच पाहण्यासारखे स्थळ आहे. दर वर्षी आलटून पालटून आमचे मास्तर मुलांना घेऊन या ठिकाणी जाऊ लागले.

रविवारी जायचे तर शनिवारपासून मुलांचा धुडगूस. भाकरी, पानगी, थालीपीठ, पोहे काहीतरी द्यावे लागे. त्याच्याशी गूळ म्हणा, पिठले म्हणा, लागेच.

सुपारीबाग! त्या स्वर्गतुल्य स्थानाचे वर्णन म्या पामराने काय करावे? या

स्थानाला 'सुपारीबाग' हे नाव का प्राप्त झाले ते तिथे गेल्यावरोबर लक्षात येते. आमच्या पट्ट्यात साखरपेंडी–गुळपेंडीकडील सुपारी आकार नि गोडी यांकरता नावाजली जाते. पण ही ऐट सुपारीबागेजवळ चालत नाही. तिथली झाडे पाहिली म्हणजे विस्मय, आदर यांनी मन भरून जाते.

बागेच्या मध्यावर श्रीकेशवराजाचे देवस्थान आहे. इथे तर सौंदर्याचा कळस झालेला आहे. देवालयाचे काळवत्री चिऱ्याचे बांधकाम, दीपमाळा, काळवत्री दगडाचा काळाभोर श्रीकेशवराज, दणदणत येणारे पाटाचे पाणी, कोळथरच्या डोंगरापासून साखरपेंडीच्या खाडीपर्यंत टप्प्यात येणारे अरबी समुद्राचे भव्य दर्शन, हर्णैचा शुभ्र दीपस्तंभ - निसर्ग आणि मानव यांच्या सहकार्याने तिथे यक्षभूमी निर्माण झाली आहे. पुनवेच्या प्रकाशात श्रीकेशवराजाचे वैभव तर अटकेपार जाते! मधूनच लकाकणारा शांत, गंभीर जलाशय, चंद्रप्रकाशाने न्हाऊन गेलेला शुभ्र दीपस्तंभ आणि खुद्द श्रीकेशवराजाच्या परिसरात पसरलेले पावित्र्याचे, शांततेचे वातावरण! फत्तरालासुद्धा काव्य स्रवण्यास लावण्याची दिव्य शक्ती या साऱ्या वातावरणातून ओसंडत असते. स्वर्गलोकात जाण्याची ही पाऊलवाट तर नव्हे, अशी कल्पना तेथील वातावरण पाहून मनात येते. मानवाची सारी दुःखे हिरावून घेऊन त्याला अनंतात भराऱ्या घ्यायला लावणारे स्थान माझ्या पाहण्यात एकच आले, श्रीकेशवराज!

या यक्षभूमीवर सहल! नुसती ही बातमी कळताच मुले नाचू लागली यात नवल काय! मोठी माणसेसुद्धा तसेच कारण घडल्याशिवाय जात नाहीत; त्या ठिकाणी ही चिमुरडी मुले जाणार होती. त्यांना झालेला आनंद त्यांच्या चेहऱ्यावर मूर्तिमंत उमटला होता.

गुरुवारची गोष्ट. सहल फक्त तीन दिवसांवर आली. मास्तर खुषीत होते. सर्व व्यवस्था झाली होती. व्यवस्था ती काय? पण जी काय थोडीफार होती ती झाली. सर्वांनी जमायचे कुठे, केळीची पाने, द्रोण कोणी घ्यायचे, तांवडीच्या कोंडातून जायचे की भैरोबाच्या–सारे व्यवस्थित आखून झाले होते. आता फक्त एक काम उरले. त्यासंबंधी बायकोजवळ बोलणे कसे काढावे, याचा विचार करत मास्तर झोपाळ्यावर बसले होते. म्हांबरीला त्यांनी पीठ दळायला सांगितले होतेच. आता फक्त बायकोला सांगायचे, रविवारी सकाळी पायलीच्या पानग्या लागतील म्हणून. ती बया लावणार नाही हे त्यांना ठाऊक होते. पण–पण म्हणूनच ते भिडावत होते. बायको पडवीचा केर काढायला म्हणून आली नि मास्तरांना पाहताच तिला आठवण झाली.

"पानग्या शनिवारी चालतील का भाजून ठेवल्या तर?"

"आँ? म्हणजे तुला कोणी सांगितलं?"

"म्हांबरीजवळ सांगायचं होतं ना!"

"मी तिला नुसतं दळायला सांगितलं होतं."

"ते झालं आज."

"तू तरी कमाल केलीस!"

"कमाल कसली? हव्यात खऱ्या!"

अशी काही चमत्कारिक स्वरात ती बोलली. घरातल्या संपत आलेल्या तांदळातून एक पायली नुसत्या पिठाकरता उचलताना तिच्या मनात जी भावना उठली त्याचे पूर्ण प्रतिबिंब त्या स्वरात उमटले होते. मास्तरांनी त्याच्याकडे काणाडोळा केला. त्यांना अजून बराच पल्ला गाठायचा होता. ही गोष्ट मनाला लावून कसे चालणार? पानग्यां-बरोबर झुणका नि लसणाची चटणी मिळाली तर फक्कड काम होईल याची त्यांना खात्री होती. पण झुणक्याला काय काय लागेल याचा शाळेतून येताना त्यांनी आढावा घेतला आणि त्यांची खात्री झाली, की कितीही फक्कड कामगिरी असली तरी ती पार पाडणे सोपे नव्हते! डाळीचे पीठ घरात होते, कांदे पण होते; पण गोडे तेल महिन्याला जेवढे लागणार तेवढे मोजूनमापून असणार याची त्यांना खात्री होती. आणखी वेळ मोडायला सवडही नव्हती. शेवटी त्यांनी हिय्या केला.

"अग, मी काय म्हणत होतो पाहा – गोडं तेल संपत आलं असेल ना?"

"आहे थोडंसं. का?"

"नि डाळीचं पीठ?"

"पण मी म्हणल्ये, अळिवांची खेड नाही का चालायची?"

"त्याला काय हरकत आहे? पण पाहिजे काहीतरी पानगीशी. नाही का? तुला कसं वाटतं?"

"मला काय वाटायचं? बरं वाटतं की. पण आपली ताकद पाहून उड्या माराव्या, एवढंच माझं म्हणणं."

"नि लसणाच्या चटणीची जरुरी नाही ना?"

त्यांच्या त्या प्रश्नाचे आईंना हसू लोटले. हसत हसत त्या बोलल्या, "जरुरी का नाही?"

"तेच म्हणत होतो मी! मग दे पैसे. आणून टाकतो. शुभस्य शीघ्रम्!"

"शुभस्य काय! पैसे नाहीत माझ्याजवळ. मोजून आठ आणे आहेत नि सारा महिना जायचा आहे अजून."

"घे त्यातले सध्या. कमी पडले घरात, तर काढू तुझ्या बँकेतून."



"तर तर! त्या पेटीला हात नाही लावायचा हं. ते पैसे भैरोबाची पालखी, गणेशोत्सव नि देवीचं हळदीकुंकू यांच्याशिवाय वापरायचे नाहीत कशाला."

"मग राहू दे चटणीचं."

पण शेवटी आईंनी चटणी करून दिली! एवढी मुले उद्या भारत जाणार; त्यांनाही आनंद नव्हता का होत? पण परिस्थितीमुळे त्यांना बोलायची इच्छा नसलेल्या गोष्टीसुद्‌धा बोलाव्या लागत.

मास्तरांच्या आयुष्यातील ही पहिलीवहिली सहल झकास झाली. दिवसभर मुले सुपारीबागेत हुंदडत होती. दुपारी तीन वाजता हर्णै बंदरात मुंबईची बोट येऊन उभी राहिली. डौलदार वळण घेऊन बंदरात प्रवेश करणारी बोट हे दुर्गेश्वराचे मनोहर दृश्य असते. 'बोट आली! बोट आली!' करत सारी मुले नाचू लागली. उन्हे कमी झाल्यावर सुपारीबागेच्या पाटाचा उगम बघायला मुले वर गेली. तिथे आल्यावर मग

मास्तरांनी नदीचा उगम कसा होतो ते मुलांना दाखवले. ते अद्‌भुत दृश्य मुले गुंग होऊन पाहात होती. त्या उंच ठिकाणावरून तो भाग अगदी स्पष्ट दिसत होता. नदीच्या मुखाच्या निर्जीव व्याख्या मुलांनी इतके दिवस पाठ केल्या. प्रत्यक्ष 'मुख' कसे असते ते त्यांनी आज पाहिले. डफळ्या ओरडला–"हात्तेच्या, हेच का 'मुख'! मी म्हणालो 'मुख' म्हणजे असतं तरी काय!"

पावसाळ्यात दुथडी वाहणारी भातखंडी नदी म्हणतात ती हीच तर! सुपारीबागे-वरून मुरूडची खाडी स्पष्ट दिसते. सुदैवाने आज भरती होती. भरतीच्या पाण्याने खाडी तट्ट फुगली होती. सालदुऱ्याच्या रस्त्यापर्यंत तिचे पाणी आले होते. भात-खंडीला मुरूडशी आल्याबरोबरच 'खाडी' का म्हणतात? खाडी होरते म्हणजे काय होते? खाडीच्या बाजूला खाजण का उत्पन्न होते? भरती येते म्हणजे होते तरी काय? ठराविक वेळेलाच भरती-ओहोटी का होतात? परश्या, डफळ्या, पकळ्या वर्गातल्या या मुखदुर्बळ मुलांना आज वाचा फुटली! भराभर मास्तरांना ते विचारत सुटले. मास्तर बोलत होते. मग मास्तरांनी हर्णै बंदरात घुसलेला समुद्राचा भाग मुलांना दाखवला. सामुद्रधुनी अशीच असते तर! साऱ्या निर्जीव व्याख्यांनी आज सजीव रूप धारण केले होते. मास्तर एकीकडे बोलत होते; मुले मुग्ध होऊन ऐकत होती.

पानगी, पानगा–पानाला पीठ लावून निखाऱ्यावर भाजलेली भाकरी; पोफळी–सुपारीचे झाड; यक्षभूमी–स्वर्गीय स्थान; खाजण–खाडीलगतची दलदलीची जमीन.

**अभ्यास :**

१. दुर्गेश्वराच्या आसमंतात कोणकोणती स्थळे आहेत?
२. 'सुपारीबाग' हे नाव कशावरून पडले? या बागेचे वर्णन करा.
३. सहलीला जाण्यासाठी मुलांनी कोणकोणती तयारी केली?
४. सहलीसाठी पानग्या आणि लसणाची चटणी घेण्याच्या बाबतीत मास्तरांचे मन का भिडावत होते? त्यांच्या पत्नीने त्या कामी त्यांना कसे साहाय्य केले?
५. 'यक्षभूमी' कोणत्या स्थळाला म्हटले आहे? का?
६. पाटाच्या उगमाजवळ मुलांनी कोणत्या गोष्टी पाहिल्या? त्या पाहून त्यांना विशेष आनंद का वाटला?
७. तुम्ही केलेल्या एका सहलीचे पंधरा ओळींत वर्णन करा.





.७.

# विनोबांच्या सहवासात

पु. ल. देशपांडे

पु. ल. देशपांडे (जन्म : १९१९.) विनोदी लेखक व नाटककार. नाट्य, संगीत इत्यादी कलांचा व्यासंग. 'तुझे आहे तुजपाशी', 'सुंदर मी होणार' ही नाटके; 'बटाट्याची चाळ', 'व्यक्ती आणि वल्ली' हे विनोदी लेखांचे संग्रह व 'अपूर्वाई' हे प्रवासवर्णन —ही व इतरही त्यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. भारत सरकारने 'पद्मश्री' ही पदवी देऊन त्यांच्या साहित्यसेवेचा गौरव केला आहे.

पदयात्रेच्या निमित्ताने श्री पु. ल. देशपांडे यांना आचार्य विनोबा भावे यांचा सहवास काही काळ लाभला. त्या वेळी त्यांना आलेले काही अनुभव त्यांनी पुढील पाठात सांगितले आहेत. त्यांतून तुम्हांला विनोबांचे ओझरते दर्शन घडेल.

गौतम बुद्धाचा संचार बिहारमध्ये झाला. त्यांच्या वाणीने, आचरणाने बिहारची भूमी पवित्र झाली आहे.

एका खेड्यातील एका तंबूत आचार्य विनोबांचे सहकारी झोपी गेले आहेत. रात्रीचे अडीच वाजले आहेत. सारी मंडळी झोपेत आहेत. त्यांची गात्रे थकली आहेत; परंतु त्यांचा उत्साह थकला नाही. त्यांच्या उत्साहाचा झरा म्हणजे विनोबाजी. तो झरा पलीकडच्या खोलीत जागता आहे. विनोबाजी ह्या सर्वांचे बाबा. ते जागते आहेत. सर्वांची ही रात्र आहे; पण तपस्वी विनोबा जागे आहेत. ते एकाग्र होऊन चिंतन करत आहेत. त्यांचा कृश देह स्वच्छ खादीच्या वस्त्रात लपेटला आहे. सारे वातावरण शांत आहे.

'घण घण घण' तीन वाजले. या घंटेने तंबू जागा झाला. मंडळींनी प्रातर्विधी आटोपले. जवळच शोण नदीच्या कालव्यावर थंडीत काही मंडळींची स्नाने चालली आहेत. सामानाची आवराआवर होत आहे. सारे काही शांतपणे चालू आहे.

पावणेचारची घंटा झाली. मंडळी प्रातःप्रार्थनेला बाबांच्या समोर येऊन बसली. तंतुवादयांचे मधुर स्वर निघू लागले. सुरेल आवाजात प्रार्थना सुरू झाली. हळूहळू साऱ्यांचा आवाज घुमू लागला. या प्रार्थनेमुळे सर्व उत्साहित झाले. बरोबर चार वाजून

वीस मिनिटांनी गोविंदाचे नामस्मरण करत पदयात्रेचे त्या दिवसाचे पाऊल पडले.

पदयात्रा सुरू झाली. पुढील गावचा वाटाड्या कंदील घेऊन सर्वांच्या पुढे चालला आहे. अत्यंत शीघ्र गतीने विनोबा चालले आहेत. आसपासची खेडी झोपली आहेत. त्या दिशेला हा प्रकाश चालला आहे. बाबा चालता चालता नक्षत्रांची माहिती देत आहेत; नक्षत्रांचा शोध घेता घेता बरेच अंतर काटले जाते आणि एकदम लक्षात येते, की नक्षत्रांचा खेळ संपला! सूर्यदेवाचे भालदार-चोपदार आले.

सूर्योदयाबरोबर पदयात्रा थांबली. विनोबांनी जलपान केले. एक वाटीभर दही घेतले. सूर्योदयाबरोबर उपवास सुटला. दोन वेळेला वाटीभर दही आणि दुपारी कसल्यातरी भाज्या उकडून त्यांचा रस हा त्यांचा आहार.



भेटलेल्या खेडुतांशी, कार्यकर्त्यांशी चर्चा करत पदयात्रा सुरू आहे. एकदा एका धर्मशाळेत मुक्काम होता. शेतकरी व कार्यकर्ते यांची सभा भरली होती. तेथील शाळेतील मुलांनी काही कविता म्हणायला सुरुवात केली. ती भावपूर्ण गाणी ऐकून बाबांच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. एकेका पोराने रानफुलांची छोटी माळ विनोबांच्या पायांशी आणून ठेवली. विनोबांनी एक हार उचलला आणि दूर असलेल्या एका पोराच्या अंगावर फेकला. त्याने तो शिताफीने झेलला. क्षणातच हारांचे गेंद झाले आणि कठोर दिसणारे विनोबा त्या किसानांच्या पोरांशी झेलाझेली खेळू लागले. क्षणात तेथे आनंदाचे शेत फुलले, डोलू-नाचू लागले.

एका गावातल्या मुक्कामाला उतरायला प्राथमिक शाळा मिळाली होती. वसंतपंचमीचा दिवस होता. तेथे थाटाचे सरस्वतीपूजन चालले होते. बिहारात सरस्वतीपूजन महाराष्ट्रातल्या गणपतिपूजनासारखे सरस्वतीच्या सुंदर मूर्तीची स्थापना करून होते.

मंडळी शाळेत आली. जयजयकाराच्या प्रचंड घोषात बाबांचे स्वागत झाले. विनोबांनी आसपास पाहिले. शाळेत कित्येक दिवसांत झाडलोट केली नव्हती.

"इथं सरस्वती आली होती का?" बाबांनी खोचकपणाने गावकऱ्यांना विचारले.

"होय बाबा!" अत्यंत भाविकपणाने शेतकरी उत्तरले. बाबांच्या प्रश्नातली खोच त्यांच्या लक्षात आली नाही.

"आणि असल्या गलिच्छ जागी तुम्ही तिची उतरायची व्यवस्था केली? अरे, साधा पाहुणा आला, तर आपण दिवाणखाना किती स्वच्छ झाडतो! बिछायत टाकतो, सारं घर सारवतो आणि सरस्वती म्हणजे केवढी मोठी पाहुणी! तुम्ही सारी शाळा अशीच न झाडता ठेवलीत?"

एवढे बोलून बाबांनी शाळा झाडायला सुरुवात केली. गावचे शंभर हात लागले. पंधरा मिनिटांत सारी शाळा, खेळाचे अंगण, एवढेच नव्हे तर शाळेपुढचा रस्ता-देखील झाडून स्वच्छ झाला; आणि सारे कसे हसत खेळत!

खेड्यातल्या लोकांशी हास्यविनोद करत बोलणाऱ्या बाबांना पाहिले, म्हणजे रात्री तीन वाजता उपनिषदांसारख्या महान ग्रंथांची उपासना करणारा, तो कठोर वाटणारा महर्षी हाच का, अशी शंका येते! वडाच्या झाडावर एकाएकी जाईच्या लाखो कळ्यांचा बहर यावा असे वाटते.

लहान मुलांपासून तो मोठ्या माणसांपर्यंत विनोबा आज माहीत झाले आहेत. त्यांचे वागणे, बोलणे, लिहिणे यांमुळे सगळीकडे लोक जागे होत आहेत. माणसाने माणसाशी माणसाप्रमाणे वागले पाहिजे, असे साऱ्या जगाला आज पटवून देत आहेत. महर्षी विनोबांना शतशः प्रणाम!

अभ्यास :

१. आचार्य विनोबा यांचा पोशाख, आहार व दैनंदिन कार्यक्रम यांची माहिती द्या.
२. मुलांशी त्यांचे प्रेमाचे वागणे असते, याबद्दलचा प्रसंग सांगा.
३. शाळेतील अस्वच्छता त्यांनी लोकांच्या लक्षात कशी आणून दिली? त्यांच्याकडून कसे काम करून घेतले?
४. पदयात्रा म्हणजे काय? आचार्य विनोबाजींची पदयात्रा कोणत्या प्रदेशात सुरू होती? या प्रदेशाचे वैशिष्ट्य (त्याचे स्वरूप, ऐतिहासिक महत्त्व इ.) सांगा.
५. खालील वाक्यांचा अर्थ स्पष्ट करा :
   (अ) सूर्यदेवाचे भालदार-चोपदार आले.
   (आ) माणसाने माणसाशी माणसाप्रमाणे वागले पाहिजे.
६. खालील शब्दांचा तुमच्या वाक्यांत उपयोग करा :
   संचार, सहकारी, एकाग्र, भाविकपणा, खोच, प्रणाम.



.८.

# मुहूर्तमेढ

शं. वा. किर्लोस्कर

शं. वा. किर्लोस्कर (जन्म : १८९१; मृत्यू : १९७५.) 'किर्लोस्कर', 'स्त्री' व 'मनोहर' या मासिकांचे माजी संपादक. हे लेखक व चित्रकारही आहेत. कै. लक्ष्मणराव किर्लोस्कर यांचे चरित्र यांनी लिहिले आहे. 'यांत्रिकाची यात्रा' हे त्या पुस्तकाचे नाव. त्यातून हा पाठ घेतला आहे.

**आज आपल्या देशात उदयोगधंदयाची भरभराट होत असलेली दिसते. लहानसहान गावीही कारखाने उभारलेले दिसतात. परंतु १९१० साली मात्र अशी परिस्थिती नव्हती. या काळात श्री. लक्ष्मणराव किर्लोस्कर यांनी एका ओसाड माळावर कारखाना उभारून त्या माळाचा कसा कायापालट केला आणि प्रतिकूल परिस्थितीवरही कशी मात केली, याचे दर्शन तुम्हांला या पाठात घडेल.**

त्या वेळच्या सदर्न मराठा रेल्वेवरील कुंडल हे एक अगदी लहान स्टेशन. अशा आडवळणी स्टेशनावर गाडी आली म्हणजेच माणसांची तेवढी तात्पुरती थोडी हालचाल दिसायची; एरवी दिवसभर सगळे सामसूम असायचे. या स्टेशनावर गाड्या थांबत त्याही उतारूंपेक्षा स्वतःच्या सोयीसाठी—इंजिनात पाणी घेण्यासाठी.

१९१० च्या मार्च महिन्यात एके दिवशी लक्ष्मणराव व त्यांच्याबरोबर अंतोबा फळणीकर, टोपण्णा सुतार व धन्या नावाचा गडी अशी मंडळी या स्टेशनावर उतरली. लक्ष्मणरावांनी नकाशा काढला व आपल्याला मिळालेली जागा ते निरखून पाहू लागले. त्यांना काय दिसले? एक उजाड टेकाड व त्यावर इतस्ततः पसरलेला निवडुंग. डोक्यावर ढगांचा एक पुंजकाही नसलेले आकाश. स्टेशनाशेजारची मास्तरांची घरे व पोर्टरांच्या दोनतीन कोठड्या सोडल्या तर मनुष्यवस्तीची तिथे आणखी एकच खूण होती; ती म्हणजे एक छोटी धर्मशाळा.

धुळवडीचा—सणाचा दिवस होता. या दिवशी किर्लोस्करवाडीची मुहूर्तमेढ रोवण्यास लक्ष्मणराव निघाले होते. एखादया महत्वाच्या कार्याचा आरंभ करण्यास धुळवडीचा मुहूर्त चांगला की वाईट, हा विचार लक्ष्मणरावांच्या मनात केव्हाच आला नाही. असल्या कल्पनांवर त्यांचा मुळीच विश्वास नसे.

आपली जागा पाहायला ते तशा उन्हातच निघाले. बाजूला निवडुंग, तर पायांखाली सराटे. तितक्यात एक नाग सळसळत त्यांच्या वाटेवरून आडवा जाऊन झुडपात अदृश्य झाला. वर्षानुवर्षे ओसाड पडलेल्या असल्या रानात सापांना काय तोटा? त्यांचेच हे साम्राज्य. त्यांचा दंश म्हणजे मृत्यूच्या घरची वाट. पुढील काळात वाडीच्या सुरक्षिततेसाठी येथे एक सर्पसत्र सुरू झाले.

या माळावर भटकत असता त्यांना एक शमीचे झाड दिसले. त्याच्या सावलीत बसून दशम्या खाता खाता कारखाना कोणत्या अंगास व राहण्याच्या झोपड्या कोणत्या अंगास घालायच्या हे त्यांनी ठरवले व परत स्टेशनावर येऊन बेळगावहून आलेल्या बांबूंच्या व तट्ट्यांच्या दोन व्यागनी उतरवण्याच्या उदयोगाला ते लागले. या लहान स्टेशनावर हे काम करायला इतक्यात मजूर मिळण्यासारखे नव्हते. त्यातलेच काही बांबू व तट्ट्ये घेऊन धर्मशाळेपुढे संध्याकाळपर्यंत त्यांनी एक मांडव तयार केला. हेच त्यांचे वाडीतील पहिले मकाण.

अशा एखादया ओसाड परठिकाणी येऊन आपला पसारा मांडायला सामान्य मनुष्य खात्रीने कचरला असता; तथापि लक्ष्मणरावांकडे पाहावे तर ते या वेळी एका सुखस्वप्नात गढून गेलेले दिसत. ठळकवाडीहून कारखान्याचे स्थलांतर करावे लागले ही खरी म्हणजे एक आपत्तीच. परंतु त्यामुळेच आपल्यास अपूर्व संधी मिळाली असे लक्ष्मणरावांना वाटले.

विलायतेतील काही कारखानदारांनी आपले कामगार व वरिष्ठ लोक यांसाठी स्वतंत्र वसाहती स्थापन केल्याचे अलीकडे त्यांच्या वाचनात आले होते. तेव्हा एवीतेवी नव्या ठिकाणी कारखान्याची स्थापना करायची तर तोच कित्ता आपण का गिरवू नये, असे त्यांना वाटले. एखादे साधे घर बांधायचे तरी माणसाला किती अडचणी येतात! आणि इथे लक्ष्मणराव असल्या आडरानात एक गावच उठवायला निघाले होते. बरे हे सारे कशाच्या जोरावर? अवघ्या साडेचौदा हजार रुपयांच्या पुंजीवर! त्यांतले दहा हजार राजेसाहेबांनी उसने दिलेले व साडेचार हजार ठळकवाडीची जागा सोडल्याबद्दल म्युनिसिपालिटीकडून नुकसानभरपाई म्हणून मिळालेले. मात्र या तुटपुंज्या रकमेच्या भरीला लक्ष्मणरावांचा प्रचंड आत्मविश्वास होता. तेच त्यांचे खरे भांडवल.

कारखान्याबरोबर नव्या ठिकाणी येण्याची इच्छा असलेले तीस-पस्तीस कामगार आपल्या बायकांमुलांसह व सामानसुमानासह लवकरच कुंडलरोड स्टेशनावर उतरले. स्टेशनाच्या आवारातला हा तांडा जाणाऱ्या-येणाऱ्या गाडीतील प्रवाशांचे लक्ष वेधून घेई. उन्हाळ्याचे दिवस असल्याने सर्व मंडळी उघड्यावरच झोपत. स्वैपाकासाठी

तेवढा धर्मशाळेचा उपयोग. त्यात पंधरा-सोळा चुली जवळ जवळ मांडून स्त्रिया स्वैपाक करत. असल्या गर्दीत कितीही गैरसोयी असल्या, तरी त्यात सहजीवनाचा एक निराळाच आनंद सर्वांना लुटायला मिळे.

पाण्याचा मात्र खडखडाट होता. सुरुवातीला ती टंचाई फारच भासली. पुढे वाडी-पासून अर्ध्या मैलावरच्या भुसाऱ्याच्या विहिरीतून पाणी आणून वाटप सुरू केले. नंतर



त्या विहिरीपासून नळ टाकून पाणी आणण्याची सोय केली. या विहिरीवर अगोदर हातपंप बसवला. पुढे इंजिनने हे काम होऊ लागले. या विहिरीवरून आलेले पाणी एका हौदात सोडले जाई व तिथून स्त्रिया घागरी भरून नेत. हा पाण्याचा प्रश्न सोडवण्यासाठी वाडीच्या मध्यभागी एक मोठी विहीर खोदण्याचे काम हाती घेतले. पण खूप खोल खणल्यावर तो प्रयत्न अयशस्वी म्हणून सोडून द्यावा लागला. त्यानंतर पुढे वाडीत घरोघर नळ झाले; पण ते पाणी चार मैलांवरून पंप करून आणावे लागते.

गावातील रस्ते व घरांच्या जागा आखण्याचे कामही सुरूच होते. लक्ष्मणरावांनी होकायंत्र व टेप घेऊन बरोबर पूर्वपश्चिम व दक्षिणोत्तर रस्ते पाडले. सर्व घरे सरळ रेषेत व प्रत्येक घराभोवती थोडे आवार. घरासाठी मातीच्या कच्च्या विटा करण्यात

काही मंडळी गुंतली. कौले येऊन पडू लागली. माणसांनी अहोरात्र खपून दहा-बारा घरे तीन महिन्यांत पुरी केली.

तोपर्यंत इकडे कारखानाही उभा राहिला. कामात एक दिवसदेखील खंड न पडता ठळकवाडीच्या कारखान्याचे स्थलांतर होऊन तो इथे व्यवस्थित चालू लागला.

झाडाशिवाय गावाला शोभा नाही. पण या कठीण मुरमाड माळावर झाडे कशी वाढायची? त्यासाठी अगोदर पुरुषभर खड्डे खणून व खतपाणी घालून, त्यांत अशोक, सिल्वर-ओक, इंडियन कॉर्क, गुलमोहर, पिंपरणी इत्यादी झाडे लावण्यात आली.

अदयाप गावात किराणा मालाचे दुकान नव्हते. तेव्हा दर रविवारी कुंडलच्या बाजाराला गाडी पाठवून सर्वांना लागणारे धान्य व मीठमिरची आणून त्याचे घरोघर वाटप केले जाई.

वाडीची पहिली शाळा शेजारच्या मायाप्पाच्या देवळात भरली व तिथे सात-आठ मुलांचा वर्ग जरंडीकर गुरुजी घेऊ लागले.

अशा प्रकारे ही चिमुकली वाडी हळूहळू आकार धारण करू लागली. एवढयात पावसाळा सुरू झाला. त्या वर्षी पावसाच्या अंगात जणू भूत संचारले! एकदा धो धो म्हणून सुरुवात झाली की सारी रात्र खंड नाही. या अतिवृष्टीने वाडीची पार दुर्दशा उडवली. मातीच्या कच्च्या विटांच्या भिंती धडाधड कोसळून त्यांचा पुरता चिखल झाला. उभे राहायला कुठेही जागा उरली नाही. सारे सामानसुमान भिजून चिंब.

पावसाचा जोर थांबला. पण सर्व घरे आता पुन्हा नव्या विटा घालून बांधली पाहिजेत. गोष्टीतल्या कोळ्यासारखीच लक्ष्मणरावांची स्थिती झाली. त्यांच्या लक्षात आले, की पांढरीच्या मातीशिवाय विटा टिकाऊ होऊ शकत नाहीत. तेव्हा तसली माती असलेले 'नखातनीचे शेत' या नावाची जागा विकत घेण्याचे त्यांनी मनाशी ठरवले. पण पैशाची वाट काय? जवळचे सर्व पैसे संपुष्टात आलेले. कुठूनतरी पैसे जमवले. शेत विकत घेतले. कामाला फिरून जोर लागला.

पुढे दिवाळीपासून नांगरांचा हंगाम सुरू झाला. सुगी चांगली झाल्याने शेतकरी खुषीत होते. हातांत पैसा खुळखुळत होता. मग नांगरांच्या मागण्यांना काय तोटा? वाडीत शेतकऱ्यांची एक जत्राच भरू लागली. हंगामासाठी अगोदर तयार करून ठेवलेले नांगर पाहता पाहता खलास झाले.

आतापर्यंत नांगराचा ग्राहक म्हणजे स्वतः वापरणारा शेतकरी अशी स्थिती होती. ती स्थिती बदलत चालली. हे नांगर भाड्याने देणे हाही एक फार किफायतशीर धंदा

आहे, हे काही हुशार व्यापाऱ्यांनी ओळखले. त्यासाठी बार्शी, लातूर, तळेगाव ढमढेरे, परभणी, अकोला अशा ठिकाणांहून हे नांगर घाऊक प्रमाणावर विकत घेणारा एक नवा वर्ग पुढे आला. नांगराबरोबर त्याचे फाळ, पाठी इत्यादी सुट्या भागांचीही मागणी वाढली.

किर्लोस्करवाडीने एक वर्षात चांगलेच बाळसे धरले. तिथल्या जीवनाला किंचित स्थैर्य आले. धंद्याचाही जम बरा बसत चालला; पण लक्ष्मणरावांना स्वस्थता ठाऊक नव्हती. 'पुढे चला' हा त्यांचा एकच मंत्र. तोच मंत्र आपल्या सर्व तरुण साहाय्यकांच्या मनावर ते सारखा बिंबवीत व त्यांच्यावरही या मंत्राचा फार परिणाम होई. त्यांपैकी एखादयाने आपल्या कामात थोडीशी निराळी चमक दाखवली, की लक्ष्मणरावांकडून त्याला मोठीच शाबासकी मिळे.

परिसाच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने होते असे म्हणतात. ते खरे असो अगर नसो, लक्ष्मणरावांच्या अशा उत्तेजनपर शब्दांमुळे साध्या कोटीतली माणसे वरच्या कोटीला चढत, हे मात्र अक्षरशः खरे. त्यांना सुरुवातीला मिळालेले बहुतेक सहकारी अननुभवी व बेताचे शिक्षण झालेले. पण लक्ष्मणरावांच्या तालमीत तयार झाल्यावर तेच केवढी महत्त्वाची व मोठमोठी कामे करू लागले!

लक्ष्मणरावांनी अनेक साध्या माणसांनाच हाताशी धरून, त्यांची सुप्त शक्ती जागृत केली. त्यांना उत्तेजन देऊन किर्लोस्करवाडीचा विकास केला आणि एका ओसाड माळाचे नंदनवन बनवले.

लक्ष्मणराव हे एक असे धाडसी व कल्पक रचनाकार होते व हीच त्यांची खरी थोरवी!

**अभ्यास :**

१. ज्या माळावर किर्लोस्करवाडी वसली आहे, त्या माळाचे वस्ती होण्यापूर्वीचे वर्णन करा.
२. एका वर्षातच किर्लोस्करवाडीला स्थैर्य कसे लाभले ?
३. लक्ष्मणरावांची खरी थोरवी कोणकोणत्या गोष्टींतून दिसून येते ?
४. जवळपास असलेल्या एखादया कारखान्याला भेट दया व त्याची प्रगती कशी झाली यासंबंधी माहिती मिळवा.
५. खालील शब्दांचे अर्थ सांगा :
मुहूर्तमेढ, वर्षानुवर्षे, चिंब होणे, किफायतशीर, अननुभवी, कल्पक, सुप्त.
६. वाक्यात उपयोग करा :
इतस्ततः, सुखस्वप्न, किल्ला गिरवणे, संपुष्टात येणे, चमक दाखवणे.





.९.

# रामटेक

नागपूरजवळ रामटेक हे तीर्थक्षेत्र आहे. ते निसर्गसुंदरही आहे. अनेक भाविक व हौशी लोकांची तिथे सारखी वर्दळ असते. अशा या निसर्गसुंदर स्थळाचा या पाठात परिचय करून दिला आहे.

कालिदासाचे प्रसिद्ध काव्य 'मेघदूत'. त्यातील कथा अशी—एका यक्षाच्या हातून चूक होते. यक्षांचा राजा कुबेर याच्या आज्ञेवरून त्या यक्षाला गृहत्याग करावा लागतो. तो यक्ष दूर रामगिरी पर्वतावर राहतो. कुठे कुबेराची राजधानी अलकावती नि कुठे रामगिरी! रामगिरीला असताना यक्षाला आपल्या पत्नीची आठवण येत असते. आषाढ महिन्यात आकाशात मेघ येऊ लागतात. अशा एका मेघाबरोबर तो यक्ष रामगिरीहून आपल्या पत्नीला खुशालीचा निरोप पाठवतो.

मेघदूतात वर्णन केलेला रामगिरी म्हणजेच नागपूरजवळचे रामटेक.

नागपूरपासून रामटेक चाळीस किमी अंतरावर आहे. नागपूरपासून रामटेकला जायला आगगाडीचा मार्ग आहे. शिवाय बसचाही मार्ग आहे. रामटेकच्या अलीकडे मनसळच्या खाणी लागतील. या खाणीत मंगल हा धातू सापडतो.

रामटेकला पोचताक्षणीच डोळ्यांना वेड लावणारे एक दृश्य दिसेल. हिरव्या झाडांच्या पांघरुणाआड दडलेली उंचच उंच टेकडी. तिच्यावर पांढरी शुभ्र देवळे. त्यांचे कळस वरच्या निळ्या आकाशाला हात लावू पाहणारे! सकाळच्या पिवळ्या धमक उन्हात नाहणाऱ्या या टेकडीचे सौंदर्य काही वेगळेच दिसते!

ही टेकडी चढून जाण्यासाठी तीन बाजूंनी पायऱ्या आहेत—गावाकडून, धूम्रेश्वराकडून आणि अंबाळा तलावाकडून. धूम्रेश्वराकडच्या पायऱ्या चढायला सोप्या आहेत. जसजसे आपण वर जातो तसतसा झाडांच्या जाळीतून सूं-सूं आवाज करत वेगाने वाहणारा वारा अंगावर येतो, पण या वाऱ्याने मन कसे प्रसन्न होते! आणि ती बघा रामाची सेना. शेपट्या उंचावत वरखाली जाणारी वानरांची टोळकी मोठ्या आशेने

जवळ येतात. थोडे फुटाणे जवळ असतील तर त्यांना देऊन टाकावे.

हे धूम्रेश्वराचे मंदिर. त्याचे दर्शन घेऊन पुढे आल्यानंतर हे नृसिंहाचे मंदिर अंबाळा तलावाकडून गडावर येणाऱ्या या पायऱ्या आणि तो दूर खाली दिसतो ना, तं अंबाळा. झाडीतून डोकावणारा हा हिरवा अंबाळा कसा पाचूसारखा चमचमतो! अंब-राजाचे गलतकुष्ठ अंबाळयाच्या पाण्याने दूर झाले अशी पौराणिक कथा आहे. सीतामाईने याच अंबाळयात स्नान केले होते; म्हणूनही अंबाळा हे मोक्षदायी तीर्थक्षेत्र मानले जाते.

हा किल्ल्याचा कोट नि तो मोठा दरवाजा पाहा. दरवाजाच्या डाव्या बाजूला



भोगरामाचे देऊळ आहे. या देवळापुढे महानुभाव पंथाचे भाविक लोक दंडवत घालतात. महानुभाव पंथाचे संस्थापक श्रीचक्रधर हे मूळचे गुजरातचे. ते रामटेकच्या यात्रेला आले होते.

उजव्या बाजूची वराहाची मूर्ती पाहा. वराहाच्या पायाखाली हिरण्याक्ष आहे. लोक पालथे पडून वराहाच्या पोटाखालच्या अरुंद जागेतून पलीकडे जातात. जे पुण्यवान असतात तेच फक्त पलीकडे जाऊ शकतात. पापी लोक वराहाच्या पोटाखाली मध्येच अडकून पडतात असे मानले जाते.

आता राम-लक्ष्मणांच्या मुख्य देवळांकडे जायचे. देवळाला फार मोठा कोट आहे. चारी दिशांना दरवाजे आहेत. हे महाद्वार. लक्ष्मणाचे देऊळ जरा पुढे आहे. त्या मागे राम-सीतेचे देऊळ. अशी आख्यायिका आहे, की वनवासाच्या चौदा वर्षांत प्रभू रामचंद्र येथे रामटेकला आले होते. पुढे धाकटा भाऊ लक्ष्मण आणि मागे सीतामाई होत्या. लक्ष्मणाने आपल्या थोरल्या भावाची कशी सेवा केली याची वर्णने अनेक स्त्रीगीतांतून नि लोकगीतांतून केली आहेत.

राम चाले वाटे, लक्ष्मण झाडी काटे,
असे बंधु नाही कोठे, संसारात.

अशा आदर्श धाकट्या भावाचे देऊळ एक पाऊल पुढेच असावे, हे योग्यच आहे.

लक्ष्मणाची मूर्ती कशी पांढरी शुभ्र! मागच्या राम-सीतेच्या देवळातील रामाची मूर्ती आहे काळीसावळी. रामाच्या शेजारची सीतामाई गोरीपान. चांदीच्या नक्षीदार प्रभावळीत रामराय नि सीतामाई उभ्या आहेत. ते कौसल्येचे देऊळ नि ते पलीकडे सुमित्रेचे देऊळ. मूर्तीच्या अंगावर हिऱ्या-माणकांचे बहुमोल अलंकार आहेत.

रामाच्या देवळाच्या मागच्या बाजूला उंच जागा आहे. तेथे त्रिपुरी पौर्णिमेला त्रिपूर लावतात. पूर्वी त्रिपुरासुर नावाचा एक राक्षस होऊन गेला. त्याने देवादिकांना अतिशय त्रास दिला. तेव्हा भगवान शंकरांनी त्याला कार्तिकी पौर्णिमेला जाळून भस्म केले; म्हणून या पौर्णिमेला त्रिपुरी पौर्णिमा असे म्हणतात. रामटेकला या दिवशी तिथल्या उंच जागेवर एका घंगाळात तुपात भिजवलेला पीतांबर जाळतात. याला त्रिपूर जाळणे असे म्हणतात. याच्या ज्वाळा दुरून दिसतात. रामटेकला त्रिपुरी पौर्णिमेला मोठी यात्रा भरते.

आता आपण कोपऱ्यातील पायऱ्यांनी रामझरोक्यात जाऊ. तेथे सोसाट्याचा वारा असतो. इथून रामटेक गावातील घरे, लाल सडका, बैलगाड्या ही कशी खेळण्यातल्या-सारखी इवली इवली दिसतात. तो विशाल रामसागर तलाव. पलीकडे खाली बघा. ते जैनमंदिर. तेही कसे देखणे दिसते!

पलीकडच्या टोकाला नागार्जुनाचे देऊळ आहे. तिथे चिंचोळ्या तिकोनी गुहेत शेंदूर माखलेली नागार्जुनाची ओबडधोबड प्रतिमा आहे. ती सीता-न्हाणी. येथे सीतामाईने अंघोळ केली होती, असे सांगतात.

आता परतायला हवे. रामटेकची विड्याची पाने आणि सीताफळे अतिशय प्रसिद्ध आहेत. पूर्वी लोक पायी काशीयात्रा करत. दक्षिणेकडच्या लोकांचा मार्ग रामटेक-वरूनच जायचा. रामटेकला यायचे, रामाचे दर्शन घ्यायचे आणि पुढे काशीयात्रेला निघायचे अशी पद्धत होती. म्हणूनच रामटेकला काशीयात्रेचे महाद्वार असे म्हणतात.

कालिदास–संस्कृत भाषेतील महाकवी व नाटककार; 'शाकुंतल' हे त्याचे नाटक व 'मेघदूत' हे काव्य सुप्रसिद्ध आहे; यक्ष–कुबेराचा सेवक; पाचू–हिरव्या रंगाचे रत्न; गलतकुष्ठ–हाताची किंवा पायाची बोटे झडून पडण्याइतका विकोपास गेलेला कुष्ठरोग; मोक्षदायी–मुक्ती देणारे; आख्यायिका–परंपरेने चालत आलेली ऐकीव गोष्ट; प्रभावळ–मूर्तीच्या पाठीमागे चांदी इत्यादी धातूंची करतात ती महिरप.

**अभ्यास :**

१. रामटेक येथे कोणकोणती देवळे आहेत?
२. रामटेकला पोचताक्षणीच डोळ्यांना वेड लावणारे कोणते दृश्य दिसते?
३. खालील वाक्यांतील मोकळ्या जागा पाठातील योग्य शब्दांनी भरा :
   (अ) मेघदूतात वर्णन केलेला…… म्हणजेच नागपूरजवळचे रामटेक.
   (आ) धूम्रेश्वराकडच्या……चढायला……आहेत.
   (इ) झाडीतून डोकावणारा हा हिरवा……कसा……चमचमतो.
   (ई) या देवळापुढे……पंथाचे……लोक……घालतात.
   (उ) रामटेकला……पौर्णिमेला मोठी……भरते.
४. एखादे प्रेक्षणीय स्थळ तुम्ही पाहिले असेल; त्याचे वर्णन करणारे पत्र मित्राला लिहा.





.१०.

# शपथ घ्या, शपथ घ्या !

प्र. के. अत्रे

**आचार्य प्र. के. अत्रे (जन्म : १८९८; मृत्यू : १९६९.) हे विनोदी लेखक, कवी, नाटककार व पत्रकार होते. त्यांची 'घराबाहेर', 'लग्नाची बेडी', 'तो मी नव्हेच' ही नाटके व 'कऱ्हेचे पाणी' हे आत्मचरित्र इत्यादी अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत.**

**स्वदेश आणि स्वदेशी यांवर उत्कट प्रेम करणाऱ्या एका शिक्षकाचे चित्र या पाठात लेखकाने रेखाटले आहे. त्यातून तुम्हांला काही स्फूर्ती घेता येते का, पाहा.**

सुभेदार नावाच्या एका नवीन गुरुजींची नेमणूक आमच्या वर्गावर झाली. सव्वीस-सत्तावीस वर्षांचे वय असेल त्यांचे त्या वेळी. उजळ रंग, तेजस्वी डोळे आणि त्यांच्या वयाला न शोभतील इतक्या, ओठ झाकून टाकणाऱ्या मोठमोठ्या मिशा. त्यांच्या मिशा बघून प्रथमदर्शनी आमच्या मनात एकदम दडसच बसली. पण त्यांनी बोलायला सुरुवात केली मात्र, एकदम वर्गामधले वातावरण बदलून गेले. त्यांच्या बोलण्याची पद्धत जलद आणि अस्थिर होती. पण त्यांच्या शब्दांमध्ये एक नवीन तऱ्हेचे आकर्षण आणि खेळकरपणा होता. "मित्रांनो !"—आम्हांला उद्देशून ते म्हणाले. पायांपासून डोक्यापर्यंत काहीतरी गोड भावना विजेच्या फटकाऱ्यासारखी चमकून गेली. आमच्या छातीत काहीतरी थर्र झाल्यासारखे वाटले. एवढीशी आम्ही पोरटी, गुरुजींनी आम्हांला 'मित्रांनो' अशी हाक मारावी ! मित्रांनो, बस्स ! त्या एका शब्दाने सुभेदार गुरुजींनी आमची मने जिंकून टाकली. एकदम आम्हांला त्यांच्याबद्दल विलक्षण आपलेपणा वाटू लागला. वर्गात एकदम शांतता पसरली. आमच्यातील थोराड आणि दंगेखोर मुले जागच्या जागी गारद झाली. "आज मी नवीनच आलो आहे," गुरुजी हसत हसत पुढे म्हणाले, "उद्यापासून आपण अभ्यासास सुरुवात करू. आज मी तुम्हांला हरिभाऊ आपट्यांच्या 'उषःकाल' कादंबरीची गोष्ट सांगतो."

वर्गात गोष्टी सांगणारे असे पहिलेच गुरुजी होते ते. एकदम वर्गाचे रुक्ष स्वरूप बदलून त्याला घरगुती स्वरूप आले. तो तास केव्हा संपला आणि दुसरा आणि तिसरा

तास केव्हा सुरू झाले हे जसे आम्हांला कळले नाही, तसे सुभेदार गुरुजींनाही ते कळले नाही; इतके आम्ही सारे त्या गोष्टीच्या आनंदात रंगून गेलो होतो.

त्या दिवसापासून आमच्या वर्गाची चर्याच मुळी बदलून गेली. सुभेदार गुरुजी वर्गात कधी येतात आणि कधी आम्हांला गोष्टी सांगतात असे आम्हांला होऊन जात असे. मराठी आणि इतिहास हे दोन विषय शिकवण्याचे काम त्यांच्याकडे आले होते. हे दोन्हीही विषय आम्हांला ते गोष्टीरूपाने शिकवत; पण अशा काही हातोटीने, की मराठी केव्हा संपे आणि इतिहासाला केव्हा सुरुवात होई हे आम्हांला मुळी कळतच नसे. त्याखेरीज उरल्यासुरल्या वेळात हरिभाऊ आपटयांच्या कादंबऱ्या ते हप्त्याहप्त्याने आम्हांला सांगत. त्यामुळे सुभेदार गुरुजींचा आम्हांला नादच लागला म्हणानात! शाळेत येताना आम्ही त्यांच्याबरोबर यायचे, शाळेतून जाताना आम्ही त्यांच्याबरोबर जायचे. दुपारी अंघोळीला घाटावर त्यांच्याबरोबर, संध्याकाळी हिंडायलाही त्यांच्याबरोबर आणि सुटीच्या दिवशी तर सकाळपासून संध्याकाळपर्यंत आमचा मुक्कामच त्यांच्या घरी असायचा.

एके दिवशी पहिल्यांच तासाला सुभेदार गुरुजी वर्गात आले. त्या दिवशी त्यांचा चेहरा विशेष गंभीर दिसत होता. ते टेबलाजवळ येऊन उभे राहिले; पण नेहमीप्रमाणे त्यांनी आमच्याकडे पाहिले नाही. त्यांची दृष्टी खाली जमिनीकडे वळलेली होती. क्षणभर ते काहीच बोलले नाहीत. त्यांचे ओठ थरथर कापत होते, असे आम्हांला वाटले. थोडया वेळाने ते हलक्या आवाजात बोलू लागले, "मुलांनो, एक अतिशय वाईट गोष्ट तुम्हांला आज सांगावी लागत आहे.....

"....आपल्या देशाचे आवडते पुढारी लोकमान्य टिळक यांना सरकारनं काल सहा वर्षं काळ्या पाण्याची शिक्षा ठोठावली आहे." बोलता बोलता सुभेदार गुरुजींचा



कंठ भरून आला आणि ते थांबले. आमच्या काळजात काही गलबलल्यासारखे वाटले. गळ्याभोवतालच्या उपरण्याच्या टोकाने गुरुजींनी आपले डोळे पुसले आणि ते पुढे म्हणाले, "आज तुम्हांला शिकवता येणं मला अगदी अशक्य आहे. विशेषतः मला तुम्हांला आता जे काही सांगायचं होतं, ते इथं वर्गात मला सांगता येणं शक्यच नाही. तेव्हा संध्याकाळी शाळा सुटल्यावर आपण गावाबाहेर जमू." असे म्हणून गुरुजी जड पावलांनी वर्गामधून निघून गेले. त्या दिवशी अभ्यासाकडे आमचे लक्ष लागणे शक्यच नव्हते मुळी. विषण्ण मनाने आम्ही शाळा सुटेपर्यंत वर्गात कसेबसे बसून राहिलो. पाच कधी वाजतात आणि शाळा केव्हा सुटते असे आम्हांला होऊन गेले होते.

शेवटची घंटा होताच आम्ही वर्गातली पंधरा-वीस मुले काखोटीला दप्तरे मारून शाळेमधून जे तडक निघालो ते निरनिराळ्या वाटांनी गावाबाहेर पडलो. सगळ्यांनी एकत्र मिळून जायचे नाही, असे आमचे आधी ठरले होते. गावाच्या उत्तरेला दोन मैलांवर एका ओढ्याच्या काठी जमायचे होते. नवरात्रात तेथे दरवर्षी जत्रा भरत असे; पण एरव्ही त्या बाजूला गावातले चिटपाखरूदेखील फिरकत नसे. म्हणूनच मुद्दाम गुरुजींनी ती जागा निवडून काढली होती. काही वेळाने आम्ही सारी मुले त्या देवळाशेजारच्या ओढ्यावर जमलो. सुभेदार गुरुजी अजून आले नव्हते. त्यांच्या वाटेकडे डोळे लावून आम्ही बराच वेळ त्या ठिकाणी बसलो. सूर्य मावळत होता. आजूबाजूच्या शेतांवर पिवळसर उन्हे अजूनही थोडी रेंगाळतच होती.

काही वेळाने गुरुजी तेथे येऊन पोहोचले. त्यांच्याबरोबर वरच्या वर्गातली दोन-तीन प्रौढ मुले होती. गुरुजी येताच आम्ही सारे उठून उभे राहू लागलो. पण 'उठू नका' असे त्यांनी आपल्या हाताने आम्हांला सांगितले. गुरुजींच्या भोवती वर्तुळ करून आम्ही बसलो आणि ते उठून मधोमध उभे राहिले. मावळत्या सूर्याच्या आरक्त प्रकाशाकडे रोखलेल्या दृष्टीने पाहात गंभीर आवाजात त्यांनी बोलायला सुरुवात केली. वर्गात शिकवताना किंवा गोष्टी सांगताना ते नेहमी जसे आम्हांला दिसत त्यापेक्षा काहीतरी निराळेच त्या वेळी ते आम्हांला दिसले. त्यांच्या मुद्रेवर नवीनच काहीतरी सामर्थ्य प्रकट झालेले होते. अर्धा-पाऊण तास ते बोलले असतील; पण तेवढ्या वेळात लोकमान्य टिळकांच्या चरित्रामधल्या कितीतरी स्फूर्तिदायक गोष्टी त्यांनी आम्हांला सांगितल्या. त्यांचा एकेक शब्द आणि एकेक वाक्य घणाच्या घावाप्रमाणे आमच्या हृदयावर आदळत होते. आणि सर्वांगातले रक्त पायापासून डोक्यापर्यंत उसळ्या मारत होते. बोलणे संपवण्याच्या आधी सूर एकदम चढवून ते

म्हणाले, "लोकमान्य टिळकांनी तुमच्यासाठी एवढं सारं केलं. तुम्ही त्यांच्यासाठी काय करणार? बोला. आजपासून परदेशी मालावर तुम्ही बहिष्कार घालणार की नाही? यापुढं परदेशी टोप्या डोक्यावर ठेवता कामा नये. परदेशी साखर तुम्ही खाता कामा नये. घ्या, शपथ घ्या!"

आंबुरशीच्या ओढयाच्या त्या ओसाडीत सुभेदार गुरुजींच्या त्या शब्दांचे गंभीर पडसाद मोठमोठ्याने निनादले. 'शपथ घ्या, शपथ घ्या!' अशीच चोहोकडून गर्जना उठली. देऊळ तेच म्हणाले, झाडे तेच म्हणाली, शेतांनी तेच सांगितले आणि ओढा तेच गरजला. आभाळात क्षितिजावर नुकताच उगवलेला एक टळक तारा त्याच अपेक्षेने टवकारून आमच्याकडे बघू लागला. आमची डोकी भडकून गेली. डोक्यावरच्या टोप्या भराभर काढून आम्ही ओढयात भिरकावून दिल्या आणि गुरुजींच्या पायावर हात ठेवून परदेशी मालावर बहिष्कार घालण्याच्या एकजात साऱ्यांनी शपथा घेतल्या.

परत येताना वाटेमध्ये आम्ही फारसे एकमेकांशी बोललो नाही. जो तो आपल्या मनामध्ये हाच विचार करत होता, की लोकमान्य टिळकांनी देशासाठी आज एवढा त्याग केला, मी माझ्या देशासाठी काय करणार? एक नवीनच प्रकाश आयुष्यामध्ये निर्माण झाला.

दडस–भीती, धास्ती; हातोटी–कौशल्य, शैली; आरक्त–तांबूस; गलबलल्यासारखे वाटणे–काळजात कालवाकालव झाल्यासारखे वाटणे; टवकारून पाहणे–नजर रोखून पाहणे.

अभ्यास :

१. सुभेदार गुरुजींनी मुलांची मने कोणत्या गोष्टींनी जिंकून घेतली?
२. सुभेदार गुरुजींचे तास कधी सुरू होत व कधी संपत हे मुलांना का कळत नसे?
३. टिळकांना झालेल्या शिक्षेमुळे मास्तरांच्या मनात कोणती खळबळ उडाली?
४. आंबुरशीच्या ओढयाकाठी गुरुजींनी मुलांना कोणता संदेश दिला? मुलांच्या मनावर त्याचा कोणता परिणाम झाला?
५. अर्थ स्पष्ट करा :
   जागच्या जागी गारद होणे, कंठ भरून येणे, चर्या बदलणे, जड पावलांनी निघून जाणे, चिटपाखरू न फिरकणे.





.११.

# निःस्पृह रामशास्त्री

कृ. प्र. खाडिलकर

कृ. प्र. खाडिलकर (जन्म : १८७९; मृत्यू : १९४८.) हे नाटककार व पत्रकार होते. 'कीचकवध' व 'भाऊबंदकी' ही यांची नाटके प्रसिद्ध आहेत. पुढील नाट्यप्रवेश त्यांच्या 'भाऊबंदकी' या नाटकातून घेतला आहे.

नारायणरावाचा खून राघोबादादांच्या आज्ञेनेच झाला अशी खात्री पटल्यावर पेशव्यांचे मुख्य न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांनी पुण्यात राहायचे नाही असे ठरवले. त्यानंतर ते राघोबाची अखेरची भेट घेण्यासाठी शनिवारवाड्यात गेले. यापुढील कथाभाग खालील नाट्यप्रवेशात आला आहे.

**रघुनाथरावदादा :** (उठून) या, शास्त्रीबोवा या. असं बसायचं होतं.

**रामशास्त्री :** श्रीमंतांबरोबर अर्धासनावर बसण्याची आम्हा गरिबांची योग्यता नाही.

**रघुनाथरावदादा :** शास्त्रीबोवा, आपणांस माहीत आहे, धनी व नोकर हे नातं आपणांसारख्या गुरुवर्यांशी ठेवण्याची पेशव्यांची रीत नाही.

**रामशास्त्री :** रावसाहेबांबरोबर जुन्या चालीरीती लयास गेल्या. आता नव्या चाली पडल्या. पुतण्याचा खून करण्याची पद्धत तुमच्या घराण्यात पूर्वी होती काय?

**रघुनाथरावदादा :** (बसत) माझ्या माथी हा अपराध नाहक आपण मारता आहा!

**आनंदीबाई :** शास्त्रीबुवा, गारद्यांच्या हातून गाय चुकून मारली गेली; तर तुम्ही या असल्या बोलण्यांनी वासरू जाणूनबुजून मारत आहा!

**रामशास्त्री :** बाईसाहेब, मला दोष देण्यापेक्षा आपल्या कर्माला दोष का देत नाही? कैलासनाथाची इच्छा तशी आहे. मी खोटं कसं बोलू? दादासाहेबांवर हा खुनाचा आरोप ठेवून गावात सर्व लोक जेव्हा कुजबुजायला लागले, तेव्हा 'देवा, हे खोटं ठरू दे' म्हणून कैलासनाथाची मी किती वेळातरी करुणा भाकली; पण कैलासनाथाच्या मनास आलं नाही. मी तरी काय करू बाईसाहेब? नारायणरावांना मारण्याचा हुकूम मी माझ्या डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहिल्यावर दादासाहेबांना मी खुनी समजू नको तर काय करू?

**आनंदीबाई :** अहो, त्या हुकमात 'धरावे' असं होतं. हे मी माझ्या डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहिलं आहे. गारदयांना चकवून तुळाजीनं तो हुकूम आपल्या हाती घेतला आणि त्यानं ताइतात घालून दंडात बांधला. गारदयांनी किंवा तुळाजीनं 'ध' चा 'मा' मागाहून केला नसेल म्हणून कशावरून?

**रामशास्त्री :** हुकमात जर 'धरावे' असं असतं तर ज्यांनी हुकूम लिहिला ते हजर असताना, दादासाहेब हजर असताना – आपण हजर असताना – गारदयांचे सरदार हजर असताना – नारायणराव मारले गेले नसते.

**रघुनाथरावदादा :** पण ह्या गोष्टीची बाटाबाट करण्याचा काय उपयोग? खऱ्या गोष्टी काय झाल्या, हे एक परमेश्वराला माहीत. तथापि नारायण मारला गेला ह्याबद्दल मला अंतःकरणपूर्वक वाईट वाटत आहे आणि प्रायश्चित्त न घेण्याचा सर्व हट्ट आम्ही सोडून दिला आहे. श्रीक्षेत्री पंढरपुरास जाऊन तिथं आपल्या हस्ते आपण सांगाल ते प्रायश्चित्त घेण्याचं आम्ही ठरवलं आहे. आपण जे आज प्रायश्चित्त सांगाल ते आम्ही आपल्यादेखत श्रीक्षेत्री घेऊ. पूर्वीच्या सर्व गोष्टी विसरा आणि ह्या अपराधाला प्रायश्चित्ताची शिक्षा सांगा.

**रामशास्त्री :** दादासाहेब, मी पंढरपुरास कसचा येतो आणि तुम्हांला प्रायश्चित्त देऊन कसचा शुद्ध करून घेतो!

**आनंदीबाई :** आपण न्यायाधीश आहा. प्रायश्चित्त दयावयाचं आपलं काम आहे. आपण पंढरपुरी आलं पाहिजे व आम्हांला प्रायश्चित्त देऊन पवित्र करून घेतलं पाहिजे.

**रामशास्त्री :** माझ्या डोळ्यांनी मी तो हुकूम पाहण्यापूर्वी प्रायश्चित्तानं मी आपणांस शुद्ध करून घेतलं असतं; पण आता काय!

**आनंदीबाई :** आता कोणती हरकत?

**रामशास्त्री :** त्या वेळी खुनाचा संशय होता, आता प्रत्यक्ष खुनी ठरला. दादासाहेब, पुतण्याचा खून करून गादी बळकावण्याचा भयंकर अपराध आपण केला आहे. त्या अपराधाबद्दल शास्त्रात देहान्त प्रायश्चित्ताशिवाय दुसरं प्रायश्चित्त नाही.

**रघुनाथरावदादा :** काय देहान्त प्रायश्चित्त!

**रामशास्त्री :** होय! देहान्त प्रायश्चित्त!

**रघुनाथरावदादा :** (उठून) देहान्त प्रायश्चित्त!

**रामशास्त्री :** होय, देहान्त प्रायश्चित्त!

**आनंदीबाई :** (पुढे होऊन) देहान्त प्रायश्चित्त ! नाही, आपण चुकून बोलला असाल. शास्त्रीबुवा, नीट विचार करून सांगा, कोणतं प्रायश्चित्त ते.

**रामशास्त्री :** बाईसाहेब, नीट विचार करून सांगतो, देहान्त प्रायश्चित्ताशिवाय दुसरं प्रायश्चित्त नाही.

**रघुनाथरावदादा :** (बसत, दुःखाने) देहान्त प्रायश्चित्ताशिवाय दुसरं प्रायश्चित्त नाही !

**आनंदीबाई :** शास्त्रीबुवा, दुसरं प्रायश्चित्त असलं पाहिजे.

**रामशास्त्री :** नाही; बाईसाहेब, नाही, दुसरं प्रायश्चित्त नाही. आपणांसारख्या महापातकी खुन्यांची सोय लावण्याकरता ऋषींनी शास्त्रं लिहिलेली नाहीत.

**आनंदीबाई :** (रागाने) काय शास्त्रीबुवा, दुसरं प्रायश्चित्त नाही ? आमची सोय पाहण्याची ऋषींना जरुरी नसली तरी तुम्हांला जरुरी आहे. नीट विचार करून उत्तर दया.

**रामशास्त्री :** दुसरं प्रायश्चित्त नाही; देहान्त प्रायश्चित्ताशिवाय दुसरं प्रायश्चित्त नाही. मी पुन्हा सांगतो, देहान्त प्रायश्चित्ताशिवाय दुसरं प्रायश्चित्त नाही.



**आनंदीबाई :** कोणापुढं, कुठं व काय बोलता आहा, ह्याची शुद्ध शास्त्रीबुवा, तुम्हांला नसावीसे दिसते. श्रीमंतांना देहान्त प्रायश्चित्त सांगणाराची जीभ येथच्या येथे छाटली जाईल, हे ध्यानात ठेवून नीट शुद्धीवर येऊन बोला! तुम्ही आमचे नोकर आहा, हे विसरलात वाटतं?

**रामशास्त्री :** बाईसाहेब, आता वाड्यात येण्यापूर्वी मी श्रीमंतांचा नोकर होतो; पण वाड्यात आलो आहे तो नोकरी सोडून दिली, हे कळवण्याकरताच आलो आहे. बाईसाहेब, ह्या जिभेनं ह्या वेळी सत्य भाषण केलं आहे. पुढं कदाचित खोटं बोलण्याचा मोह तिला उत्पन्न होईल, तेव्हा ह्याच वेळी तिला छाटून टाकून सत्य बोलण्यात ह्या जिभेची समाप्ती आपण केली, तर मला समाधानच आहे. राघोबा, पेशव्यांच्या गादीचा नोकर नसलेला हा रामशास्त्री तुला देहान्त प्रायश्चित्त सांगत आहे. राजाज्ञेनं तुझं डोकं उडवलं जाण्याचा संभव नसेल, तर देहाला झिजवून झिजवून अखेरीस देहाच्या पतनानं पापक्षालन कसं करावं, ह्या तपश्चर्येचा धडा शिकण्याच्या उद्योगास लवकर त्वां लागावं, हे बरं. मजबरोबर गंगाकिनारी येत असशील, तर हा धडा शिकवण्यास मी तयार आहे. खुनी पेशवा गादीवर असेतो-पर्यंत पुण्याच्या हद्दीत पाणी प्यायचं नाही, ह्या प्रतिज्ञेनं मुलंमाणसं माहुलीस पाठवून मी घराच्या बाहेर आता पडलो आहे. स्वतः देहान्त प्रायश्चित्त कसं घ्यावं हे शिकण्याची जर राघोबा, तुझी इच्छा असली तर गंगाकिनारी—

**आनंदीबाई :** गंगाकिनारी तपश्चर्या करत बसण्याच्या गोष्टी शास्त्रीबुवा, आता विसरा. पेशव्यांचा असा उपमर्द करणारांना गंगाकिनारी स्वस्थपणानं जाऊन बसण्याची फुरसत मिळत नसते. तुम्ही आम्हांला कोण प्रायश्चित्त सांगणार? विद्वत्तेची खोटी घमेंड तुम्हांला झालेली; निःस्पृहतेचा नसता टेंभा तुम्ही मिरवणारे; तपश्चर्येच्या व देवधर्माच्या वल्गना तुमच्या तोंडात कशाला? स्वतःच्या मोठेपणाच्या फाजील गर्वानं तुमची बुद्धी कुजली आहे. मुख्य न्यायाधीशाची जागा मिळाल्यामुळं तुमचं मन नासलं आहे. माझ्या तोंडून निघेल तो शब्द खरा ह्या अहंकारानं तुमचं शरीर तारवटून बेताल झालं आहे! तपश्चर्या आता अंधार-कोठडीत! प्राण जाऊन कपाळमोक्ष होईतो अंधारकोठडी तुमच्या कपाळाची सुटली नाही म्हणून समजा! कोण आहे पलीकडच्या दालनात? सुमेरसिंग, खरकसिंग, तुळाजी या, लवकर या, आणि ह्या उन्मत्त माथेफिरूला कैद करा.

(सुमेरसिंग, खरकसिंग, तुळाजी येतात.)

शास्त्रीबुवा, पुन्हा एकवार नीट विचार करा. तुमच्या सांगण्यावरून किरकोळही प्रायश्चित्त आता आम्ही घेत नाही. पण तुम्हांला जर एखादया डोंगरी किल्ल्यावरील अंधारकोठडी टाळायची असेल आणि गंगाकिनारी स्वस्थपणे स्नानसंध्या करत बसण्याची परवानगी पाहिजे असेल, तर नारायणाच्या वधासंबंधानं श्रीमंतांची लवलेशही चूक नाही, इतकंच नव्हे, तर असले धर्मभीरू, प्रतापी व पुण्यश्लोक श्रीमंत पेशव्यांच्या गादीस पुन्हा लाभणार नाहीत, असं भरदरबारात जाहीर करण्यास तुम्ही तयार झालं पाहिजे.

**तुळाजी :** हे जाहीर कशाला करायला पाहिजे? सूर्याचा प्रकाश जसा लपवता यायचा नाही, तसं ह्या धर्मावताराचं तेज लपवता येणार नाही.

**खरकसिंग व सुमेरसिंग :** जगात अशी एकही जीभ नाही, जी श्रीमंतांचा प्रताप कबूल करणार नाही.

**तुळाजी :** जगात अशी एकही तरवार नाही, जी ह्या पुण्यश्लोक श्रीमंतांचं मस्तक धडापासून दूर करू पाहात आहे.

**सुमेरसिंग व खरकसिंग :** हुकूम व्हावा, ही जीभ येथल्या येथे छाटून टाकतो!
(रामशास्त्र्यांच्या एका बाजूस एक असे उभे राहतात.)

**आनंदीबाई :** शास्त्रीबुवा, तुम्हांला आम्ही कैद केलं आहे. बोला, अंधारकोठडीत पडता का भरदरबारात श्रीमंतांचं यश गाऊन आताच्या अपराधातून मोकळे होता?

**रामशास्त्री :** पाहिजे तर माझी जीभ छाटून टाकण्याचा हुकूम करा; पाहिजे तर अंधारकोठडीत, काट्यांच्या पिंजऱ्यात मला कोंडून ठेवा; पाहिजे तर ज्या तरवारींनी नारायणरावांचे तुकडे तुकडे केले, त्याच ह्या तरवारी माझ्याही शरीरावर पाहिजे तशा चालवा! मला कोठेही न्या, कसाही ठेवा; शब्द उच्चारण्याची जिभेत शक्ती असेतो मोठमोठ्याने ओरडून सर्व दुनियेला मी जाहीर करणार —नारायणरावाचा खून राघोबानं केला आहे आणि ह्या पापाला देहान्त प्रायश्चित्ताशिवाय दुसरं प्रायश्चित्त नाही.

**आनंदीबाई :** ह्या उन्मत्त माथेफिरूच्या मुसक्या अगोदर बांधा, पकडा त्याला! पाहता काय? धरा त्याला! अंधारकोठडीत देहान्त प्रायश्चित्त आपणांस आता लवकरच मिळेल! पकडा त्याला—पाहता काय?

(सुमेरसिंग व खरकसिंग पकडू लागतात.)

**रघुनाथरावदादा :** नका, शास्त्रीबुवांना कैद करू नका. माझ्या डोक्यावर पूर्वीच्या पातकांचंच ओझं मोठं आहे. नको, रामशास्त्र्यांच्या खुनाच्या पातकाची आणखी भर नको. जा शास्त्रीबुवा, ह्या आमच्या राज्यातून एकदम बाहेर निघून जा. आमची निंदा करायला जर क्षणभर अधिक आमच्या राज्यात राहिला, तर खरोखरच तुमची जीभ छाटली जाईल. सुमेरसिंग व तुळाजी, पुण्याच्या हद्दीबाहेर ह्यांना बंदोबस्तानं काढून लावा.



देहान्त प्रायश्चित्त–मृत्यूची शिक्षा; नाहक–विनाकारण; पापक्षालन–पापापासून मुक्तता; पुण्यश्लोक–पवित्र; गारदी–पहारेकरी; मुसक्या बांधणे–हात मागे आवळून बांधणे; तोंड बांधणे.

**अभ्यास :**

१. रघुनाथरावदादांनी कोणते पाप केले होते?
२. राघोबादादाला प्रायश्चित्ताची शिक्षा देण्याचे रामशास्त्र्यांनी का नाकारले?
३. आनंदीबाईंनी रामशास्त्र्यांना अटक करायला का सांगितले? त्यांना अटक का झाली नाही?
४. रामशास्त्र्यांनी नोकरी का सोडून दिली?
५. आनंदीबाई, राघोबादादा व रामशास्त्री यांच्यापैकी कुणाचे विचार तुम्हांला आवडले? का?
६. रामशास्त्र्यांच्या स्वभावातील विशेष गुण दाखवणारी या पाठातील वाक्ये शोधून काढा.
७. पुढील वाक्प्रचारांचा तुमच्या वाक्यांत उपयोग करा :
लयास जाणे, करुणा भाकणे, उपमर्द करणे, कपाळमोक्ष होणे, टेंभा मिरवणे.





.१२.

# सर्कशीत चिमणराव

चिं. वि. जोशी

चिं. वि. जोशी (जन्म : १८९२; मृत्यू : १९६६.) हे विनोदी लेखक होते. त्यांची 'एरंडाचे गुऱ्हाळ', 'चिमणरावांचे चऱ्हाट', 'आणखी चिमणराव' ही व इतरही काही पुस्तके प्रसिद्ध आहेत. पुढील पाठ त्यांच्या 'चिमणरावांचे चऱ्हाट' या पुस्तकातून घेतला आहे.

दुसऱ्यांना मदत करण्याची संधी शोधणाऱ्या चिमणरावांवर एका सर्कशीत कोणता दुर्धर प्रसंग ओढवला याची कथा वाचून तुमची भरपूर करमणूक होईल.

दुपारी तीनच्या सुमारास प्रोफेसर सर्कसवाले आले व मला 'कॅप्टनसाहेब' अशी हाक मारून त्यांनी नमस्कार केला.

"कोण प्रोफेसरसाहेब! उन्हाच्या वेळी कोसभर मजल का मारली?"

"आपल्याला भेटायला, कॅप्टनसाहेब! कालच आपण सांगितलं, की परोपकार आणि समाजसेवा हे आपल्या बालचमूचं कर्तव्य आहे. आणखी आजच त्याची प्रचीती पाहायची वेळ आली आहे, कॅप्टनसाहेब."

"फार छान. आम्ही परोपकाराची संधी पाहातच होतो, प्रोफेसरसाहेब. पण काय करावं? कुठं आग लागत नाही, पूर येत नाही, एन्फ्लुएंझासारखी साथ येत नाही, कुछ नाही. आमची ही सफर फुकट जाते असं मला वाटत होतं. सांगा, काय काम आहे ते, प्रोफेसर."

"काम असं आहे, कॅप्टनसाहेब," खाकरून प्रोफेसरांनी सुरुवात केली, "आज आमच्या सर्कशीत वाघ, अस्वल आणखी गाय यांचं सहभोजन आहे, असा कार्यक्रम लावून तिकिटं खपवली. आणखी आता अशी पंचाईत आली — ती आपल्याजवळ कशी सांगू, कॅप्टन?"

"सांगा, सांगा, संकोच नका करू. मी वाघ नि अस्वलाचा बंदोबस्त ठेवीन. वाटलं तर प्रेक्षकांत बंदोबस्त ठेवतो."

"बंदोबस्ताचं काही नाही हो, पण काय सांगू! वाघ आणि अस्वल यांची मारामारी होऊन दोघेही दुखणाईत पडले आहेत."

"म्हणजे काय!" चकित होऊन मी म्हणालो.

"अहो, दोन डोंबारीच वाघाचं अन अस्वलाचं काम करतात! आम्हांला कुठं खरा वाघ ठेवायची ऐपत आहे! त्यांना रोजचा खुराक घालताना आमचं अर्धं उत्पन्न खर्च होईल."

"पण ती गाय तरी खरी आहे का? का एखादा बहुरूपी गायीचं काम करायला ठेवला आहे!"

"गाय खरी आहे हो! सर्कशीत काम करून बिचारी शेरभर दूध देते. आणखी दिवसभर लोकांच्या शेतातून हिंडून आपलं पोट भरते. गोमाताच ती!"

"पण आता या बनावात मी काय करू? त्या डोंबाऱ्यांना औषधपाणी करू? फर्स्ट-एडचं सामान आहे आमच्याजवळ."

"ते दोघे अंथरुणाला खिळून आहेत. फर्स्ट-एडनं त्यांना काही व्हायचं नाही. आपल्याला आता अशी विनंती आहे, की आपल्या दोन सैनिकांना वाघ-अस्वलांची सोंगं घेऊन गरिबाला मदत करायला सांगा आणि वेळ निभावून न्या, कॅप्टनसाहेब! गावातल्या कोणाला मी चार पैसे देऊन बोलावलं असतं; पण त्यांच्या तोंडात काही राहायचं नाही अन माझी फजिती होईल!"

सर्व बालवीरांस समोर उभे करून त्यांना प्रोफेसरांची परिस्थिती मी निवेदन केली. अबदुल्ल्याला अस्वलाचे काम शोभण्यासारखे असल्याने ते त्याला देण्याचे नक्की ठरले. वाघाच्या कामासाठी चार उमेदवार होते; पण मला त्याची फार हौस असल्याने ते मी आपल्याकडे ठेवले. लगेच आम्ही नसरापुरास गेलो.

अबदुल्ल्याला व मला सायंकाळी पाच वाजताच शिकारखान्यात नेले. बाकीच्यांची सोय सर्कस कंपनीच्या बिऱ्हाडात केली होती. आम्ही दोघांनी वेष परिधान केले व शेजारशेजारच्या पिंजऱ्यात प्रवेश केला. मी आजपर्यंत अनेक प्रकारचे वेष धारण केले होते. शाळेत असताना संमेलनाच्या नाटकात दासीसुद्धा झालो होतो. परंतु पशुवेष घालण्याचा हा पहिलाच प्रसंग! यामुळे फार गंमत वाटली. परंतु अंगाला खाजबीज सुटल्यास खाजवण्याची सोय बिलकूल नव्हती. सर्कशीच्या वेळेखेरीज इतर वेळी सर्कशीचा शिकारखाना पाहण्याचा दरवेळी अर्धा आणा दर देऊन पुष्कळ लोक जनावरे पाहण्यास येत. सर्वांत जास्त प्रेक्षक माझ्याच पिंजऱ्यापुढे जमत. त्यामुळे मला बराच त्रास होत होता. 'हा वाग तर लई मरतुकडा दिसतुया र!' 'आरं, ह्यो

तर विचटा हाय, वाग कसला ?' अशा प्रकारची निंदाव्यंजक वाक्ये ऐकताच राग येऊन मी डरकाळ्या फोडी. त्या ऐकून माझ्या निंदकांची तोंडे बंद होण्याऐवजी ते म्हणतात, 'हात तुझं ! खायला मिळालं न्हाई काय पंधरा दिवसांत! डुरकणीनं कोंबडी-दिखील भ्यायची नाही !' मग खट्टू होऊन मी कोपऱ्यात बसे. एका वेळी एक बाई आपल्या मुलाला घेऊन शिकारखाना पाहायला आली होती. मला पाहून ते मूल भ्याले. त्याची गंमत करण्यासाठी मी डुरकावणी फोडली, तो त्या बाईने एक खडा घेऊन मला मारला व मुलाकडूनही खडे मारवले. वाघास बोलता येत नाही हे ध्यानात न राहून मी म्हटले—"हं ! मार बया ! सापळ्यामध्ये वाघ सापडे, बायका-मुले मारिती खडे !"

माझे वाक्य पुरे होण्यापूर्वीच त्या मानुषी वाणीने बाई भयभीत होऊन 'भूतभूऽभूऽ' करत जमिनीवर पडली. लोक जमले; परंतु माझ्या सुदैवाने तिची दातखिळी बसल्याने माझे बेंड फुटले नाही.

अबदुल्ला अस्वलाचे काम सुरेख करत होता. दोन पायांवर नाचणे, माणसास वाकुल्या दाखवणे, सलाम करणे, त्यांनी मारलेले खडे उलट मारणे याच्या योगाने तो फार लोकप्रिय झाला. अस्वलाच्या पिंजऱ्यापुढे सगळी गर्दी जमली. वनराज वाघास कोणीच विचारीना ! एक प्रकारे हे बरे झाले. मला वाघासारखे बसता किंवा चालता येत नव्हते. डुरकून डुरकून घसा फुटण्याच्या बेतात आला होता. त्यामुळे मला गर्दी सहन होईना. वसंत कुत्रा वासाने मार्ग काढत माझा पिंजरा शोधून बाहेरच येऊन बसला होता. राघूही एकदा येऊन 'अप्पा, तुम्हांला चहा हवा आहे का हो ?' असे विचारू लागला. प्रेक्षकांना ही भानगड समजेना. प्रोफेसर जवळ उभे होते. ते म्हणाले, "हा मुलगा फसला ! वेडा रे वेडा. याच्या मामाचं आडनाव वाघ आहे म्हणून याला वाटलं हा वाघच आपला मामा ! जा बाळ, तंबूत जा !"

रात्री दहाला सर्कस सुरू झाली. बाराला माझे काम सुरू झाले. मी माणसासारखा दोन पायांवर चाललो. कडयातून उडया मारल्या. हुकूम दिले, त्याबरहुकूम मी कवाईत करून दाखवली. वाघाचे इतक्या बुद्धीचे काम इतर कोणत्याही सर्कशीत झाले नसेल !

शेवटी सर्कशीतले कळसकाम दाखवण्याचे राहिले. नोकरांनी तीन घडवंच्या ठेवून मध्ये एक वाटोळे मेज ठेवून दिले. मग मला एका घडवंचीवर बसवण्यात आले. मी गुरकावून नापसंती दर्शवली; परंतु प्रोफेसरांनी चाबकाचे फटकारे लावल्याने गप्प राहिलो. मग अस्वलाचा वेष घातलेला अबदुल्ल्या आला. तो मला पाहून भ्याला व कुरकुर करू लागला. अस्वल कसे ओरडते ते अद्याप त्याला माहीत नव्हते. पण प्रेक्षकांनाही ते

माहीत नसल्यामुळे वेळ निभावली. अस्वलाच्या अंगावर केस दाट असल्याने चाबकाचे फटकारे त्याला लागले नाहीत. पिस्तुलाचे दोन बार काढताच सर्व प्राणी उभे राहिले व माझ्यासमोरच्या घडवंचीवर बसले. आम्ही दोघांनी पंजांनी एकमेकांस बोचकारले व जरा भांडण केले. मग गाय आली व तिसऱ्या घडवंचीवर उभी राहिली. मी काही खात नसल्याने कलिंगड व भाजलेले वांगे यांची योजना केली होती.



गायीला गवत आणि आंबोण ठेवले होते. भोजनास प्रारंभ होताच प्रेक्षकांतून टाळ्यांचा मोठा गजर झाला; परंतु वाघ व अस्वल नेहमीचे नाहीत असा गायीला सुगावा लागला. बराच वेळ ती आमच्याकडे आळीपाळीने बघून संशय दर्शवत होती. थोड्या वेळाने खात्री होताच तिने माझ्यावर शिंगे रोखली. मी गुरगुरलो व पंजे काढले. परंतु ती मुळीच घाबरली नाही. अस्वलाने तिला पंजा मारला, त्यासरशी चवताळून ती त्याच्या मागे लागली. अबदुल्ल्या चपळ असल्याने तंबूच्या मधोमध खांबावर चढला. प्रेक्षकांस हा कार्यक्रमाचा भाग वाटून त्यांनी टाळ्या दिल्या.

अस्वल हातचे निसटताच गायीने पुन्हा वाघावर हल्ला केला. मी आपले व्याघ्रत्व विसरून दोन पायांवर धावून व 'अहो प्रोफेसर ! धावा धावा !' असे ओरडून गायीला चुकवू लागलो. 'अरे लुच्च्यांनो, तरी आम्हांला संशय येतच होता, की या वाघाच्या

शेपटीत जीव कसा नाही!' 'ही सर्कस का बहुरुप्यांचा खेळ?' 'अरे, हा वाघाचं कातडं पांघरणारा गाढव कशाला आला? घ्या याचं कातडं हिसकावून!' अशा आरोळ्या ऐकू आल्या. सगळे प्रेक्षक उठले. त्यांनी मला, प्रोफेसरांना व सर्कसवाल्यांना गराडा दिला. दहापाच जणांनी माझा पोशाख हिसकावून घेतला आणि माझ्या शरीराचे जोराने मर्दन चालवले.



**अभ्यास :**

१. हा पाठ वाचताना तुम्हांला विशेष हसू कोठे कोठे आले? का?
२. प्रोफेसरांनी कोणता खेळ करायचे ठरवले होते? त्या वेळी कोणती अडचण उद्भवली?
३. त्यांनी त्या अडचणी कोणकोणत्या उपायांनी दूर केल्या?
४. वाघास कोणीच विचारत नव्हते, असे लेखकाने का म्हटले आहे?
५. वाघ आणि अस्वल खरे नसून खोटे आहेत हे प्रेक्षकांनी कशावरून ओळखले?
६. तुमच्या जीवनात अशा एखादा विनोदी प्रसंग घडला असल्यास त्याचे वर्णन करा.
७. 'बेंड फुटणे' याच अर्थाचा 'बिंग फुटणे' हाही एक वाक्प्रचार आहे. यासारखे पुढील वाक्प्रचारांसाठी कोणते वाक्प्रचार वापरता येतील?
तोंडात न राहणे, तोंड बंद होणे, गराडा देणे.



.१३.

# काझीरंगा

वसंत अवसरे

डॉ. वसंत अवसरे (जन्म : १९१२.) यांची 'मिझूंच्या प्रदेशातून', 'लाल नदी, निळे डोंगर' ही प्रवासवर्णनपर पुस्तके प्रसिद्ध आहेत. 'काझीरंगा' हा पाठ त्यांच्या 'लाल नदी, निळे डोंगर' या पुस्तकातून घेतला आहे.

महाराष्ट्रातील एका अभयारण्याचे वर्णन तुम्ही यापूर्वी वाचले आहे. डॉ. अवसरे यांनी आसाममधील अभयारण्याचे वर्णन या पाठात केले आहे.

सुमारे दोनशे पासष्ट चौरस किमी विस्तार असलेली 'काझीरंगा' पशुस्थळी अथवा अभयारण्य साऱ्या भारताचे एक भूषण आहे. एक आफ्रिका सोडल्यास इतके विविध आणि असंख्य पशुपक्षी आसामशिवाय जगाच्या पाठीवर इतरत्र कुठेच आढळत नाहीत. इतकेच नव्हे, तर आसाममध्ये वावरणारे काही काही प्राणी जगाच्या पाठीवर दुसरीकडे कुठेही आढळत नाहीत. हुलॉक नावाचा एक पुच्छविहीन वानर फक्त आसामातच आढळतो. भारताच्या इतर कुठल्याही प्रांतांत त्याची वस्ती नाही. त्याचे हुलॉक हे नावसुद्धा त्याच्या आवाजावरून पडले आहे.

आसामचे वैशिष्ट्य दाखवणारा दुसरा प्राणी म्हणजे एकशिंगी गेंडा. राज्य सरकारचे प्रतीक म्हणून आसामात ठिकठिकाणी त्याचे पुतळे उभारलेले आढळतात. कुणी म्हणेल हा अगदी निर्बुद्ध प्राणी एखादया राज्याचे प्रतीक म्हणून का पसंत केला जावा ? पण प्रथमदर्शनी वाटतो तितका हा प्राणी टाकाऊ नाही. कोणातरी इंग्रज कवीने गेंडयावर एक लहानशी कविता करून तो माणसापेक्षा कसा श्रेष्ठ आहे ते दाखवले आहे.

एखादयाचा पुतळा पाहणे आणि त्याला प्रत्यक्ष पाहणे यांत फार फरक असतो. मी तर गेंडा व त्याच्याबरोबर आसामातले इतर पशुपक्षीही प्रत्यक्ष व जवळून पाहण्याची संधी मिळावी म्हणून काझीरंगाला आलो होतो. अशा ठिकाणी वन्यपशू बहुधा सकाळी लवकर अथवा सूर्यास्ताच्या वेळी पाहावयास मिळतात.

आदल्या रात्री खूप पाऊस पडला होता. तेव्हा सकाळी जर पावसाची बुरबुर चालू राहिली तर जंगलात जाणे कठीण हे मी जाणून होतो. पण माझे नशीब जोरदार होते. दुसऱ्या दिवशी सकाळी आकाश पूर्णपणे निरभ्र होते. पूर्वेचा वारा पण इतका शांत होता, की जंगलात फिरणाऱ्या जनावरांना आमचा वासही येणे कठीण होते. काझीरंगाची भूमी ही कर्दमभूमी आहे. इथल्या कमरेइतक्या चिखलातून फिरणे माणसाला अशक्यच. शिवाय इथे सर्वत्र इतके उंच गवत वाढलेले असते, की त्यात हत्तीवर बसलेला माणूसही लपून जातो.

प्रवाशांना या जंगलात फिरवून आणण्यासाठी आसाम सरकारने पंधरा-वीस हत्ती खास शिकवून तयार ठेवलेले आहेत. हे हत्ती वन्यपशूंना घाबरत नाहीत व दाट गवतातूनही ते मार्ग काढू शकतात. साधारणतः असा समज आहे, की गेंडा हत्तीच्या अंगावर चालून जातो. पण शेजाऱ्याला निष्कारण त्रास देणे वन्यपशूच्या रक्तातच नसते. गेंडादेखील या नियमाला अपवाद नाही. क्वचित केव्हातरी एकटा असलेला गेंडा समोर येणाऱ्या पशूवर धडक मारायला निघतो. पण एकलकोंडेपणाचे पर्यवसान तिरसटपणात झाले नाही तरच नवल. जगातील प्रचंडकाय प्राण्यांत भारतातील एकशिंगी गेंड्याचा चौथा नंबर लागतो म्हणतात. पहिल्या तिघांत आफ्रिकी हत्ती, भारतीय हत्ती व आफ्रिकेतला सफेद गेंडा यांचा समावेश होतो.

जंगलात फिरण्यासाठी मला एक हत्तीण मिळाली होती. तिचे नाव वैजयंती असे होते. मोठी देखणी, इंद्राच्या ऐरावताची मुलगी शोभेल अशी होती ती. आणि चालत-पण होती अशी ऐटीत, की गवतातून चालताना जणू रेशमी साडी सळसळते आहे असे वाटावे! निघाल्यापासून थोड्याच वेळात ती एका जराशा उघड्या ठिकाणी आली आणि माहुताने खूण केल्याबरोबर उभी राहिली. समोरच आमच्याजवळ एक गेंडा अगदी निश्चल उभा होता. चिलखत घालून पहाऱ्यावर उभ्या असलेल्या एखादया विशालकाय योद्ध्यासारखा. जराशी मान हालवून त्याने आमच्याकडे पाहिले व मनात नक्की केले, की आपली जागा सोडून पुढे-मागे होण्याची जरुरी नाही. त्याचा फोटो घेण्याची माझी मनीषा जाणून माहुताने हत्तिणीला चुचकारत चुचकारत उभी केली. मी गेंड्याचे मनसोक्त फोटो घेतले

त्या माहुताकडून दोन गोष्टींची माहिती मिळाली. बाजारात गेंड्याच्या नाकावरील शिंगाची किंमत जवळजवळ दोन हजार रुपये इतकी असते ही एक व दुसरी अशी, की शरीर थंड राखण्यासाठी चिखलाने अंग माखून घेणारा गेंडा हा सामाजिक

आरोग्याचा भोक्ता असतो. सबंध मोठया जंगलात फक्त एकाच ठिकाणी जाऊन तो आपली विष्ठा टाकतो. कित्येक मैल दूर असला तरी त्याच एका जागेवर तो नेहमी परतून येतो. घाण वाटेल तेथे टाकू नये, शेजाऱ्या-पाजाऱ्यांना त्रास होईल असे वागू नये हे समजणारा गेंडा निःसंशय शहाणाच म्हटला पाहिजे.

माहुताने खूण केली व गर्रकन वळसा घेऊन वैजयंती दुसरीकडे निघाली. त्याच वेळी एक पांढरा शुभ्र गायबगळा डोक्यावरून पंख हालवीत उडाला. मी लगेच मनात नक्की केले, की जवळपास कुठेतरी रानम्हशींचा कळप असला पाहिजे. माझा तर्क खरा ठरला. गिरकी घेऊन बगळा जिथे उतरला त्या दिशेने माहुताने वैजयंतीला हाकारले आणि पाच-पंधरा म्हशींचा एक कळप शांतपणे चरताना आमच्या दृष्टीस पडला. म्हशी गवतातून चालतात त्या वेळी गवतातले अनेक लहान कीटक घाबरून हवेत उडतात. त्यांना खाण्यासाठी बगळे नेहमीच म्हशींच्या जवळ अथवा त्यांच्या पाठीवरही येऊन बसतात. विशाल शिंगांच्या दहा-पंधरा म्हशींच्या मधून वावरणारे बगळे पाहून मनात आले, की निसर्गाची ही काळ्यावरची पांढरी लिपी केव्हातरी



कागदावर चित्रित केली पाहिजे. आसामी जंगलातल्या या रानम्हशींची शिंगे दिसायला मोठी सुंदर आणि विशाल अर्धचंद्राकृती असतात.

हत्तीपेक्षाही उंच असलेल्या 'एलिफंट ग्रास' (हत्ती-गवत) मधून चिखल तुडवत माहुताने वैजयंतीला पुढे काढली. थोडे अंतर चालून गेल्यावर मध्येच थांबून तिने सोंड वर केली आणि तुतारीसारखी दीर्घ किंकाळी फोडली. मला वाटले काहीतरी संकट आहे. माहुताने इकडे तिकडे नजर फिरवली आणि हत्तिणीला पुढे चालण्याची सूचना केली. सावधपणे पावले टाकत, गवतातून चालत ती एका डबक्यापाशी आली. डबक्याच्या काठावर एक हरीण मरून पडले होते. हत्तिणीने पुन्हा एक किंकाळी फोडली आणि तोंड हवेत फिरवून चारी दिशांचा वास घेतला. जणू काय मृत्यूची पावले आजूबाजूला कुठे रेंगाळत आहेत की काय याचा मागोवा ती घेत होती. माहुताने वैजयंतीला जरा खाली वाकायला लावले आणि आपल्या सोबत्याला खाली उडी मारायला सांगितले. त्या सोबत्याने खाली उतरून हरणाच्या प्रेताचे नीट निरीक्षण केले. कुठल्या तरी प्राण्याने छातीत शिंग खुपसून त्याची हत्या केली होती.



किती नाजूक, सुंदर जीव; पण जनावराच्या एका आंधळ्या, वेड्या लहरीबरोबर चक्काचूर झाला त्याचा! माझे मन क्षणभर बधिर झाले.

काझीरंगाचा विस्तीर्ण वनप्रदेश तुडवत आणि भिजलेल्या वाऱ्यावर मंद मंद गतीने तरंगत गिरक्या घेणारा जमिनीचा व गवताचा वास हुंगत वैजयंती प्रवासी बंगल्याच्या दिशेने चालू लागली. का-कोण जाणे, पण वाटेत पुन्हा ती थबकली आणि त्याच वेळी समोरून हरणांचा एक कळप उड्या मारत पळत पळत निघून गेला. त्या हरणांकडे पाहून एका विलक्षण समाधानाने माझे मन भरून आले. त्यांचा तो कळप सारंगांचा आहे असे मनाला वाटू लागले. किंचित काळसर अंगावर अस्पष्ट पांढुरके ठिपके असलेल्या हरणांना संस्कृत भाषेत सारंग म्हणतात. या हरणांचा कळप वेगाने जातो, त्या वेळी एखादा काळा-पांढरा ढग वाऱ्यावर तरंगतो आहे असे वाटते. ढगालाही संस्कृत भाषेत सारंग हे नाव आहे.

वैशाखातल्या पांढुरक्या ढगासारखे क्षणाक्षणाला वेगळे रूप घेणारे मन तिथे घोटाळत असता वैजयंती काझीरंगाच्या कडेला येऊन उभी राहिली. प्रवासी बंगला तेथून जवळच होता.



**अभ्यास :**

१. 'काझीरंगा' या अभयारण्याचे वैशिष्ट्य कोणते?

२. आसाम राज्यात ठिकठिकाणी गेंड्याचे पुतळे का आढळतात?

३. अभयारण्यात फिरवून आणण्यासाठी आसाम सरकारने कोणती व्यवस्था केली आहे?

४. रानम्हशी व बगळे यांचे वर्णन लेखकाने कोणत्या शब्दांत केले आहे?

५. खालील शब्दांचे अर्थ सांगा :
निर्बुद्ध, पर्यवसान, अर्धचंद्राकृती, प्रतीक, कर्दमभूमी, प्रचंडकाय.

६. वाक्यात उपयोग करा :
मनसोक्त, निःसंशय, गर्रकन, मृत्यूची पावले, क्षणाक्षणाला.

७. आसाममधील गेंड्यासंबंधी थोडक्यात माहिती लिहा.





.१४.

# मार्टिन् ल्यूथर किंग

ना. ग. गोरे

ना. ग. गोरे (जन्म : १९०७.) यांनी कथा, ललितलेख, चरित्र, प्रवासवर्णन, मुलांसाठी नाटुकले इत्यादी विविध प्रकारचे लेखन केले आहे. त्यांची 'करवंदे', 'डाली' व इतर अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत.

महात्मा गांधींचे नाव कुणाला ठाऊक नाही? ते दलितांचे कैवारी होते. त्यांच्या शिकवणुकीचा प्रभाव जगातील अनेक विचारवंतांवर पडला. मार्टिन् ल्यूथर किंग हे त्यांपैकीच एक. अमेरिकेतील आफ्रिकी लोकांच्या उद्धारासाठी ते आमरण कसे झगडले, ते या पाठात वाचा.

४ एप्रिल १९६९ या दिवशी कोणा एका माथेफिरूने गोळी झाडली आणि एक चाळिशीच्या उंबरठ्यावर उभा असलेला तरुण धरणीवर कोसळला. तो कोणी धनपती नव्हता, की सेनापती नव्हता. पण सगळे जग त्याच्या मरणाने हादरले, हळहळले. साऱ्या जगाने हळहळावे असे त्या तरुणात काय होते? कोण होता तो? त्याचे नाव काय? त्याचे नाव मार्टिन् ल्यूथर किंग. त्याचा देश अमेरिका.

हे लोक मूळचे आफ्रिका खंडात राहणारे. काळ्याशार वर्णाचे हे लोक. साडेतीनशे वर्षांपूर्वी युरोप-अमेरिकेमधल्या गोऱ्या लोकांनी काही आफ्रिकी लोकांना पकडून गुलाम म्हणून अमेरिकेतल्या मळेवाल्यांना विकले. त्यांचीच नातवंडे-पणतवंडे आज अमेरिकेमध्ये 'काळे आदमी' म्हणून राहात आहेत. मार्टिन् ल्यूथर किंग हा त्यांपैकीच. आफ्रिकी लोकांच्या दहापंधरा पिढ्या तेथे काबाडकष्ट करून जगल्या आणि मेल्या; तरी त्यांना अमेरिकेमधील गोऱ्या लोकांच्या बरोबरीचे स्थान मिळालेले नाही. खेड्यांमधून, शहरांतून या काळ्या लोकांची वस्ती गोऱ्या लोकांच्या वस्तीपासून दूर, वेगळी ठेवलेली असते. त्यांच्या मुलांसाठी वेगळ्या शाळा असतात. उपाहारगृहे वेगळी असतात. बसमध्ये मागच्या बाजूला काळ्या उतारूंकरता वेगळ्या जागा ठेवलेल्या असतात. अमेरिकेतील

जनतेची जशी काही दोन कायमची छकले पडलेली आहेत—काळे आणि गोरे!

मार्टिन्‌चा जन्म १९२९ च्या जानेवारी महिन्यात झाला. त्याच्या जन्मगावाचे नाव ॲटलांटा. मार्टिन्‌चे घराणे खाऊनपिऊन सुखी होते. बाळसेदार मार्टिन्‌चे सगळे जण कौतुक करत. स्वभावाने तो द्वाड होता. खूप दंगामस्ती करी. फारसा तापट नव्हता; पण कधी रागावला की मात्र हमरीतुमरीवर यायचा. हट्ट करायचा. त्याची बुद्धी तल्लख होती आणि गळा फार गोड होता. चार वर्षांचा असताना तो ख्रिस्त-स्तुतीचे अभंग गाऊ लागला, की आजूबाजूचे बाया-बापे गोळा होत आणि ऐकता ऐकता ताल धरत. मार्टिनचे वडील ॲटलांटा शहरातील चर्चचे उपाध्याय होते. त्याचे आजोबादेखील तेच काम अखेरपर्यंत करत होते. मार्टिन्‌ची आई शिक्षिका होती. मार्टिन् भराभर शिकत होता. वडलांचे बोट धरून रस्त्याने चालताना तो दुकानावरील पाट्या, बसवरील अक्षरे व अंक जुळवून वाचू लागला आणि तेव्हाच त्याच्या बाल-मनाला पहिले चटके बसू लागले. 'फक्त गोऱ्या लोकांसाठी', 'काळ्या लोकांनी मागच्या बाकावर बसावे' अशा पाट्या तो वाची. गोरे शिपाई, गोरे दुकानदार आपल्या वडलांना 'ए पोऱ्या' म्हणून हाक मारताना तो ऐके. 'त्या काळ्या पोरा-बरोबर नाही खेळायला जायचं,' असे गोऱ्या बाया आपल्या मुलांवर खेकसत!

मार्टिन् वयाने वाढत होता तसा शरीराने व बुद्धीनेही वाढत होता. तो खूप वाची. अमेरिकेतील आफ्रिकी समाजाला गुलामगिरीमधून बाहेर काढण्याकरता जे पुढारी पूर्वी धडपडले त्यांची चरित्रे तो वाची आणि मनात म्हणे—आपणही मोठेपणी तसेच करू. तो स्पर्धांत भाग घेऊ लागला. फर्डा बोलणारा झाला. एकदा वक्तृत्वस्पर्धेत दुसऱ्या क्रमांकाचे बक्षीस मिळवून तो परत येत असता केवळ आफ्रिकी म्हणून त्याला बसमधला सगळा प्रवास उभ्याने करावा लागला. मार्टिनच्या मनाला त्यामुळे फार वेदना झाल्या.

विद्यापीठात गेल्यावर मार्टिन्‌ने अनेक विषयांचे ज्ञान मिळवले. पीएच्. डी. साठी त्याने तत्वज्ञान हा विषय घेतला. ही परीक्षा तो फार चांगल्या प्रकारे उत्तीर्ण झाला. गुरुजनांनी त्याची पाठ थोपटली. विद्यापीठात शिकत असतानाच त्याचा गांधीजींच्या विचारांशी परिचय झाला. त्याच काळात त्याचा कोरेटा स्कोट नावाच्या सुंदर गायिकेशी विवाह झाला. १९५५ मध्ये डेक्सटर येथील चर्चचे धर्मोपदेशक म्हणून मार्टिन् काम पाहू लागले. आणि त्याच साली डिसेंबरच्या पहिल्या तारखेला तिथे अशी एक घटना घडली, की जिच्यामुळे मार्टिन्‌च्या जीवनातले एक नवीन जळ-जळीत प्रकरण सुरू झाले.

बसने प्रवास करणाऱ्या रोझा पार्क नावाच्या एका आफ्रिकी बाईला एका गोऱ्या उतारूसाठी जागेवरून उठण्यास सांगण्यात आले. तिने नकार दिला. बसच्या ड्राय-व्हरने पोलिसाकडे तक्रार केल्यावरून लगेच तिला अटक करण्यात आली. हा लहानसाच प्रसंग; पण पुढे निर्माण झालेल्या देशव्यापी आंदोलनाचे तो बीज ठरला. रोझा पार्कच्या अटकेचा निषेध म्हणून कोणीही आफ्रिकी माणसाने बसमध्ये चढायचे नाही असे ठरवण्यात आले. पाच डिसेंबरपासून बहिष्काराला प्रारंभ झाला आणि जनतेने त्याला अशी साथ दिली, की तब्बल एक वर्षापेक्षा अधिक काळ हा बहिष्कार चालू राहिला ! शेकडो सभा, मोर्चे यांनी ते वर्ष गजबजून गेले. या सर्व आंदोलनात विचारांची शिदोरी पुरवणारे, प्रक्षुब्ध दंग्याधोप्यापासून लोकांना दूर ठेवणारे, पददलित लोकांच्या मनात स्वाभिमानाची ज्योत पेटवणारे असे एकमेव पुढारी मार्टिन् ल्यूथर किंग हे होते.



अमेरिकेतील जे गोरे लोक उदार मताचे होते त्यांनी मार्टिन् यांच्या मागण्यांना पाठिंबा दिला. काळ्या लोकांना सौजन्याने वागवा, त्यांना बरोबरीचे समजा, त्यांना

हीन लेखू नका हाच त्यांच्या मागण्यांचा मथितार्थ होता. पण जे जुन्या वळणाचे कट्टर लोक होते त्यांनी मार्टिन् यांचा व त्यांच्या अनुयायांचा छळ आरंभला. त्यांनी मार्टिन्ना तुरुंगात पाठवले. त्यांना धमक्या दिल्या. बॉंब फेकून त्यांच्या घराचा सज्जा उद्ध्वस्त केला. पण मार्टिन् डगमगले नाहीत. आंदोलकांनी शांत राहावे, गोऱ्यांचा द्वेष करू नये, हिंसेला हिंसेने उत्तर देऊ नये असाच त्यांनी आग्रह धरला. गांधीजींच्या विचारांचे आचरण मार्टिन् अमेरिकेत करत होते. सोने विस्तवात घातल्याने ते उजळ होते तसे मार्टिन् उजळून निघत होते. वयाच्या अवघ्या २७ व्या वर्षीच मार्टिन् यांच्यावर सर्व जगाचे डोळे खिळून राहिले. १९६३ साली वॉशिंग्टन येथे जनतेने जे विराट निदर्शन केले त्यामुळे तर मार्टिन् यांच्या पुढारीपणावर, लोकमान्यतेचा कळस चढला. १९६४ साली मार्टिन् यांना शांततेचे नोबेल पारितोषिक मिळाल्याचे प्रसिद्ध झाले, तेव्हा जगातल्या सगळ्या सद्विचारी लोकांनी मोठ्या समाधानाने माना डोलवल्या.

लवकरच त्यांच्या या चढत्या जीवनाचा अगदी अचानकपणे अंत झाला. त्यांच्या आंदोलनाला मिळत असलेला प्रतिसाद सहन न झाल्यामुळे म्हणा किंवा त्यांच्या वाढत्या कीर्तीचा मत्सर वाटल्यामुळे म्हणा, एका गोऱ्या इसमाने मेंफिस या गावी गोळी झाडून मार्टिन् ल्यूथर किंग यांची प्राणज्योत मालवून टाकली.अमेरिकेमधील दीड कोटी लोकांचा आणि जगातील दलितांचा आधारस्तंभ असा एकाएकी निखळून पडला. परंतु त्यांनी समानतेचे जे स्वप्न पाहिले ते खरे ठरल्यावाचून राहणार नाही.

पृथ्वीपती–सम्राट; छकले–तुकडे; हमरीतुमरी–अरेतुरे; फर्डा–खंदा, पट्टीचा; प्रक्षुब्ध–खवळलेला; पददलित–पायदळी तुडवलेले, दीन; मथितार्थ–सार.

**अभ्यास :**

१. मार्टिन् यांना वर्णद्वेषाची जाणीव प्रथम केव्हा झाली ? का ?
२. अमेरिकेत आफ्रिकी लोकांना कोणत्या प्रकारची वागणूक दिली जाते ?
३. नेतृत्व करण्यास योग्य असे कोणते गुण मार्टिन् यांच्यामध्ये होते ?
४. कोणता लहानसा प्रसंग देशव्यापी आंदोलनास कारणीभूत झाला ? या आंदोलनाचे नेतृत्व मार्टिन् यांनी कसे केले ?
५. मार्टिन्च्या मृत्यूने सर्व जगाला का हळहळ वाटली ?
६. 'मार्टिन् यांची शिकवण' या विषयावर दहाबारा ओळी लिहा.





.१५.

# ऋणानुबंध

शांताराम

प्रा. के. ज. पुरोहित (जन्म : १९२३.) हे अमरावती येथे इंग्रजी विषयाचे प्राध्यापक आहेत. यांचे 'संध्याच्या बागा', 'छळ व इतर कथा', 'शिरवा' इत्यादी कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. 'शांताराम' या टोपणनावाने ते लेखन करतात. पुढील कथा त्यांच्या 'छळ व इतर कथा' या कथासंग्रहातून घेतली आहे.

स्वतःच्या वास्तूशी माणसाचा कसा ऋणानुबंध जुळलेला असतो व तिच्याबद्दल माणसाला किती जिव्हाळा वाटतो हे या कथेत सांगितले आहे.

अप्पासाहेब कुलकर्णी आणि त्यांचा थोरला मुलगा भय्या या दोघांशीही माझी मैत्री आहे. नोकरीच्या निमित्ताने भय्या गाव सोडून गेला तेव्हापासून अप्पासाहेबांची आणि माझी मैत्री चांगलीच वाढली आहे. रोज संध्याकाळी गावाबाहेर फिरायला जायचे व मनात येईल त्या विषयावर मनमोकळेपणाने बोलायचे हा आमचा कार्यक्रम झाला आहे. पण आता यापुढे आमचा हा कार्यक्रम बंद होणार, आता अप्पासाहेबदेखील गाव सोडणार.

गाव सोडण्याची अप्पासाहेबांची इच्छा नव्हती. पण भय्याच्या इच्छेपुढे त्यांचे काय चालणार? स्वतःची इच्छा नसतानाही त्यांनी भय्याचे म्हणणे मान्य केले. त्यांनी दाखवले नाही तरी मला माहीत होते, की गावातले घर विकून शहरात जायचे त्यांच्या जिवावर आले असेल.

भय्याचे म्हणणेही चूक नव्हते. त्याचे म्हणणे असे, की यापुढे सगळे कुटुंब शिक्षणासाठी, उपजीविकेसाठी शहरात राहणार, तेव्हा गावातले घर ठेवायचे आणि शहरात राहायचे असा दुहेरी प्रपंच कशाला? त्यापेक्षा गावातले घर विकून जे पैसे येतील, त्यात थोडीशी भर घालून शहरात घर बांधले तर मुलांच्या शिक्षणासाठी व जमले तर भाड्यासाठी उपयोग होईल.

अप्पासाहेबांनी भय्याच्या योजनेला संमती दिली ते केवळ गृहकलह टळावा

म्हणूनच. त्यांच्या मनात भय्याविषयी काही गैरसमज असला तर मित्रकर्तव्य म्हणून तो दूर करावा या हेतूने मी रदबदलीसाठी अप्पासाहेबांकडे गेलो.

वळसे घेत घेत मी त्यांना म्हणालो, "अप्पासाहेब, आता तुम्ही शहरचे रहिवासी होणार; पण अधूनमधून माझ्याकडे आलं पाहिजे तुम्ही. वर्षातून एकदा तरी तुमची पायधूळ गावात झडली पाहिजे."

"जरूर झडेल, हे काय सांगायला हवं? कोण खुषीनं शहरात जातोय! आहे काय तिथं! धड मोकळी हवा नाही की चांगलं खाणं नाही."

"ते खरं अप्पासाहेब, पुढला सर्व विचार करता शहरातच घर असायला हवं. शहरात शिकलेली तुमची मुलं आणि नातवंडं या गावात राहून काय करणार?"

"ते खरं आणि म्हणूनच घरविक्रीला मी संमती दिली; पण मला वाईट वाटलं तुम्हा नवीन लोकांच्या वृत्तीचं."

"का? काय झालं? भय्या काही कमीजास्त बोलला-वागला काय?"

"ऐका, सांगतो. नाही तरी मी आता इथून जाणार. पूर्वीसारख्या गप्पा व्हायच्या नाहीत आपल्या. आज बोलूनच घेतो."

मी बोला म्हटलं आणि अप्पासाहेब सांगू लागले, "मला झालेल्या प्लेगची ही आठवण आहे. आता ही आठवण मोठी रोमांचकारी वाटते. पण प्रत्यक्ष त्या वेळी क्षणाक्षणाला माझी परीक्षाच होत होती....गावात उंदीर पडू लागल्याची कुणकूण नुकतीच सुरू झाली. एकच उपाय होता—आपापली घरं सोडायची अणि गावाबाहेर नदीच्या तीरावर झोपड्या बांधून राहायचं. घराला कुलूप ठोकून आम्ही बाहेर पडलो. निघताना थोडी भांडीकुंडी, एकदोन खाटा, कपडे आणि घरातलं किडुकमिडूक तेवढं घेऊन बाहेर पडलो; पण तेही सामान काही कमी नव्हतं. गावातून नदीकाठी सामान न्यायला नोकर कुठले मिळणार? ज्याला जेवढं जमेल तेवढं ओझं त्यानं डोक्यावर घेतलं. साठी उलटून गेलेल्या माझ्या आईबापांनाही ओझं घ्यावं लागलं. आम्ही एकटेच काही संकटात नव्हतो. सगळं गाव आपत्तीत सापडलं होतं.

"नदीच्या किनाऱ्यावर पहिली रात्र आम्ही उघड्यावर कुडकुडत झाडाखाली घालवली. एकमेकांच्या सहवासाचीच काय ती ऊब त्या रात्रीच्या थंडीत व दवात आम्हांला मिळाली.

"दुसऱ्या दिवशी मी झोपडी बांधायला सुरुवात केली. नदीच्या काठची जमीन. हिरवंगार गवत चिकार वाढलेलं. अंग मोडेपर्यंत ते सगळं खुरप्यानं कापून काढलं.

अंगावर किती ठिकाणी खरचटलं ते मोजता येत नव्हतं. जमीन साफ केली खरी; पण तेवढ्यावरच झोपडी कशी उभी करायची? पाणी जवळच असल्यामुळं दलदल फार.



खटपट करून थोडेसे वासे जमवले. तट्टे गोळा केले व दोन-तीन दिवसांत झोपडी उभी केली.

"झोपडीत झोपायला खाटा पुरेशा नव्हत्या. म्हाताऱ्या आईबापांना व गर्भार बायकोला खाटा देणं आवश्यक होतं. मध्येच रात्री प्रभुकृपेचा वर्षाव झाला. झोपडीत पायभर पाणी साचलं. थंडी मी म्हणत होती. झोपायचं कसं? सबंध रात्र मी डोळे चोळत काढली.

"पण त्यानंतरच्या रात्री तशा जागेतही मला डाराडूर झोप लागली. मध्यरात्री मला माझ्या वडलांचं कण्हणं ऐकू आलं. त्यांच्या अंगावर हात ठेवून बघतो, तो ते गरम झालेलं. 'शीण असेल' असं वडील म्हणाले.

"सकाळी उठून नदीच्या पलीकडच्या तीरावरील वाडीत मी भाजीपाला आणायला गेलो. भाजी घेऊन माझी नाव तीराला लागली. पहातो तो, माझी बायको घामाघूम होऊन काठावर उभी! 'काय झालं?' म्हणून विचारलं, तर ती म्हणाली 'घरी लवकर चला. मामंजी कसंतरी करतात....'"

"घरी जाऊन बघितलं तो वडील तापानं फणफणत, व्यथेनं किंकाळ्या देत पडलेले. त्यांच्या जांघेतून गाठ आली होती. मी समजलो. प्लेगनं इथंही पाठ सोडली नव्हती. पण प्लेग झाला हे कुणाला सांगायचं नाही. ते लोकांना कळलं तर ती वस्तीही सोडावी लागली असती. चूपचाप डॉक्टरला बोलावलं, त्यानं करायचे ते उपचार केले. पण वडील रात्रभर तळमळत होते. ते पाहवत नव्हतं तरी नुसतं पाहावं लागलं. रात्र सगळ्यांनी जागून काढली. काय झालं आहे हे माझ्याखेरीज कुणाला नीट कळलं

नव्हतं. रामप्रहराला वडलांच्या वेदना वाढल्या, किंकाळ्या वाढल्या, तडफड वाढली. वडील वारले. आई वडलांच्या प्रेताला सोडीना. कशीतरी तिची समजूत घातली. तिचा हंबरडा ऐकू आला नाही अशा वृत्तीनं मी पुढल्या व्यवस्थेला लागलो.

"आईच्या डोळ्याचं पाणी खळेना. काय बोलावं हे मला सुचेना. बायकोचे दिवस भरत आलेले. छातीवर दगड ठेवून मी जे पुढं येईल त्याला तोंड देत होतो. पण एक सरलं न सरलं तोच दुसरं उद्‌भवलं. बायको बाळंत झाली. आमचा भय्या झाला.

"नवा जीव जन्माला आला. आईच्या धीराचं कसं कौतुक करावं ते समजेना. जणू काही झालं नव्हतंच अशा उत्साहानं तिनं नव्या जीवाचं स्वागत केलं. तिच्या आवडीनंच त्याला आजोबांचं नाव ठेवण्यात आलं. गावाबाहेरच्या त्या चंद्रमौळी झोपडीत, दुःखाच्या त्या वैराणात सुखाचं फूल उगवलं. पण मी इतका पिचलो होतो, की झालेला आनंद दाखवत हसावं, की न संपणारी दुःखं भोगत रडावं हे मला कळेना. भय्या आमचं पहिलं अपत्य. त्यात मुलगा. पण माझ्याच्यानं सुखदुःखाचे हे चटके सहन होत नव्हते. माझं जीवनचक्र इतक्या वेगात फिरू लागलं होतं, की अनेक वर्षांत यावे ते अनुभव थोड्याच दिवसांच्या अंतरानं माझ्या वाट्याला येत होते.

"झोपडीतला चिमुकला पाहुणा दहा दिवसांचा झाला नसेल, तोच माझ्या खाकेत गोळा आला. अंगात ताप सणसणला. यातना असह्य झाल्या. प्लेगनं मला न्यायचंच ठरवलेलं दिसत होतं. आई आपलं उतारवय विसरली, ताजं दुःख विसरली. बायको आपली प्रकृती विसरली, नवा जीव विसरली आणि दोघीही माझं निस्तरू लागल्या. नुसतं काम करायचं आणि आकाशाकडं पाहायचं. आकाश मात्र झोपडीच्या छपरातून जागजागी स्पष्ट दिसत असे—तेवढाच आधार!

"डॉक्टरला बोलावण्यात आलं. तो ओळखीचा होता. त्यानं धीर दिला. झोपडीतल्या दिवलाणीकडे आई सारखी बघत बसे आणि मनातल्या मनात ईश्वराचा धावा करी. बायकोला वेड लागायचं शिल्लक उरलं होतं. नवा जीव—हा भय्या मात्र मुठी चोखत हसत पडून राही.

"पण हळूहळू ते संकट टळलं. मी पूर्ण बरा झालो. गावातला प्लेग संपला. झोपड्यांतील लागण बंद झाली. आकाश निरभ्र झालं. गावात परत जायची वेळ आली.

"सगळं सामान जुळवून मी निघण्याची तयारी केली; पण आईचे पाय हालेनात. मी आणि बायको जागच्या जागी खिळून राहयलो. आईचे डोळे पाण्यानं डबडबले.

"मी निघण्याची घाई करू लागलो. पण आई निघेना. बायको निघेना. मी

समजलो. माझ्या वडलांची आठवण त्यांना मागे ओढत असावी. आई म्हणाली, 'या वेळी मला रडू येतं ते ही झोपडी सोडताना. हे घर नाही सोडवत रे! दोन अडीच महिने राहयलो इथं, सुखदुःखं अनुभवली. आता पाय नाही उचलत.'

"सुखं कसली, सगळी दुःखंच अनुभवली होती त्या दोन महिन्यांत आम्ही. तरीही ते घर सोडताना आई रडत होती, बायको रडत होती, मी रडत होतो. आम्हांला रडताना बघून भय्यानं भोकाड पसरलं.

"आता मात्र सगळं बदललं. हा भय्या पार बदलला. तुमची पिढीच सगळी बदलली. हे घर विकताना भय्याला काही वाटलं नाही. त्याच्या डोळ्यांत एक थेंब नाही."

अप्पासाहेबांचा चेहरा व्याकुळ दिसत होता. डोळे पाणावले होते. मी गहिवरलो; पण भय्याच्या वतीनं मी म्हणालो, "अप्पासाहेब, एका गावाहून दुसरीकडं जायचं, जिथं पोट भरेल ते आपलं गाव समजायचं ही पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेली रीत नाही का? मग भय्याचंच काय चुकलं?"

"ते ठीक आहे. पण मला राग येतो तुम्हा नवीन लोकांच्या वृत्तीचा. एवढं अनेक पिढ्यांचं घर आज विक्रीला निघालं. कित्येक वर्षांचे नाजूक पाश आता तुटणार. एक इतिहास सबंध मिटणार; पण तुम्हा नवीन लोकांच्या डोळ्यांत एक अश्रू नाही. भावनेचा ओलावा नाही."

अप्पासाहेबांचा आवाज घोगरा झाला होता. विलक्षण भेदक झाला होता. काळाचा विलाप, इतिहासाचा आक्रोशच जणू माझ्या कानात शिरत होता आणि मला हादरवीत होता.

गृहकलह – घरातील भांडण; दिवलाण – दिवली, लहान दिवा, पणती; वासे – वांबू.

**अभ्यास :**

१. अप्पासाहेब कुलकर्णी गाव का सोडणार होते?
२. प्लेगच्या साथीत अप्पासाहेब कुलकर्णी कुठे राहायला गेले? तिथे त्यांना कोणकोणत्या हालअपेष्टा सोसाव्या लागल्या?
३. झोपडी सोडताना त्या सर्वांना वाईट का वाटले?
४. अप्पासाहेबांना नवीन लोकांच्या कोणत्या वृत्तीबद्दल वाईट वाटत होते? का?
५. तुमचे घर सोडायची तुमच्यावर पाळी आली तर तुमच्या मनात कोणकोणते विचार येतील?





.१६.

# मोराचे पीस

गो. रा. दोडके

गो. रा. दोडके (जन्म : १९१०, मृत्यू : १९६३.) यांचा 'मी श्रीमंत आहे' हा पाठ तुम्ही यापूर्वी वाचला आहे. श्री. दोडके हे लघुनिबंधकार व कथालेखक होते. 'माहेरवाशीण' व 'गाभारा' ही त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. 'मोराचे पीस' हा लघुनिबंध त्यांच्या 'गाभारा' या लघुनिबंध-संग्रहातून घेतला आहे.

आपल्या भवतीभोवती कितीतरी सुंदर गोष्टी असतात; पण त्यांच्याकडे आपले लक्ष क्वचितच जाते. नित्याच्या परिचयाने या गोष्टींचे सौंदर्य आपल्या नजरेत भरत नाही. आपली दृष्टी जणू आंधळी बनलेली असते. आणि म्हणूनच 'डोळे उघडे ठेवून बघा!' असे सांगायची वेळ येते. आता या मोरपिसाचीच गोष्ट पाहा ना!

मी माझ्या मैत्रिणीला एक पुस्तक वाचायला दिले होते. भरकन वाचून तिने ते मला लगेच परत केले होते. तिच्याकडून पुस्तक आले की माझे आपले नेहमीचे ठरलेले. पानांमध्ये असलेली जाईजुईची फुले, रेशमी फितींचे तुकडे वगैरे तिच्या गोष्टी अगदी तत्परतेने साभार परत करायच्या. नेहमीप्रमाणे मी पुस्तकाची पाने चाळून पाहू लागलो. त्यांत इतर खुणा होत्याच; पण आज एक नवीनच खूण आढळून आली—मोराचे पीस.

पुस्तकात मोरपिसे ठेवली व त्यांना रोज कुंकू घातले म्हणजे बुद्धी वाढते, अशी लहानपणी आम्हां मुलांमध्ये कल्पना होती. त्या वेळी मोरपिसांचे मला भारी वेड होते. मी माझ्याजवळच्या पेन्सिली वगैरे देऊन मोराची पिसे घेई. अशा रीतीने मी खूपशी पिसे आपल्याजवळ जमवून ठेवली होती. त्या काळानंतर कितीतरी वर्षांनी मी आज एक पीस अगदी जवळून बघत होतो. ते पाहताना अनेक आठवणी मनात आल्या आणि त्या पिसाचे नानाविध रंग माझ्या डोळ्यांत भरून राहिले. पिसावरील डोळ्यांच्या मध्यभागी असलेला निळा रंग, त्यानंतर भोवती असलेले हिरव्या रंगाचे वलय, पलीकडे असलेली राजवर्खी छटा, नंतर पोपटी आणि नंतर काळसर जांभळा.

हे रंग पाहून झाल्यावर दृष्टीचा कोन बदलला, की सगळेच रंग निराळे! निसर्गाच्या या चिमुकल्या कृतीमध्ये असे किती रंग आहेत, की ज्यांना कलावंतांच्या भाषेत नावे प्राप्त झालेली नाहीत. कुणाला वाटेल, केवळ रंगांची कलाकुसर दाखवण्याकरताच सृष्टीने मोराचे पीस निर्माण केले असावे.

किती गोड असतो त्याचा स्पर्श! अगदी रेशमासारखा मुलायम. शिवाय किती सजीव असते हे पीस! दोनचार वेळा त्याच्यावरून करांगुली फिरवा व त्याच्यासमोर बोट धरा, त्याची बारीक बारीक टोके चटकन धावून येतात. जिव्हाळ्याचे कुणी दूर गावाहून आले की आपण कसे धावत जातो व त्याच्याभोवती पिंगा घालतो? अगदी तशी! खेळकर तरी किती म्हणता? लहान मुले मधल्या बोटावर फसवाफसवीचा, बोट ओळखण्याचा खेळ खेळत असतात ना? त्याप्रमाणे पीसदेखील तुमच्याशी खेळते. ते म्हणते, "ओळखता आमचा रंग? हं, ओळखा पाहू! काय, हिरवा आहे म्हणता? छट्! चुकलात तुम्ही." आणि हे अगदी बरोबर आहे. आपण आपल्या दृष्टीचा कोन बदलला की निराळेच रंग दिसू लागतात.



मोराच्या त्या पिसाकडे बघता बघता मनात असे विचार येत होते, जात होते.

आज सहजच मला केवढे सौंदर्य पाहायला मिळाले होते! केवढ्या आनंदाचा लाभ झाला होता! परंतु त्या पिसात तरी विशेष काय होते? सृष्टीतली प्रत्येक लहानथोर वस्तू अशीच नाही का? ती निर्माण करताना निसर्ग आपले सारे कौशल्य उपयोगात आणतो. लहानलहानशी फुले, त्यांच्यातील सौंदर्य, कलाकुसर किती मनोहर असते! पण कधी तरी बघतो का

आपण त्यांच्याकडे मन लावून? छे! कसे बघणार? ही कामे रिकामटेकड्यांची; उद्योगी अथवा शहाण्या माणसांची नव्हेत! पण एखादयाने जर उघड्या डोळ्याने पाहतोच म्हटले, तर त्याचे श्रम काही वाया जायचे नाहीत. फुलांच्या पाकळ्यांचा आकार, त्यांची मांडणी, पाकळ्यांवर आलेले नाना रंगांचे ठिपके आणि तेही इतक्या नाजूकपणे दिलेले, की बघताना माणसाची मती गुंग व्हावी! प्रत्येक फुलाची ठेवण निराळी, रंग निराळा, त्यावरची वेलबुट्टी निराळी. फुलेच काय पण फुलपाखरे, वृक्षवेली, नदया, पर्वत, उदयास्त आणि स्त्रीपुरुष यांच्या अंगी निसर्गाने तेच सौंदर्य, तीच गूढता आणि तीच वेधकता भरून ठेवली आहे. सौंदर्य अगदी उघड्यावर पडलेले आहे आणि माणसाला डोळे आहेत. एखादयाला आपण म्हणतो, 'अरे, उघड्या डोळ्यानं बघ, बाबा.' तो म्हणतो, 'मिटल्या डोळ्यांनी कसं बघायचं सांगा तरी!' यात विनोदाचा थोडासा भाग असला; तरी एक मात्र सत्य आहे—क्वचितच आपण उघड्या डोळ्यांनी सृष्टीकडे पाहतो.

मोरपिसांचा पंखा कितीतरी लोक वापरत असतील! सुखाने, ऐटीने, थाटाने श्रीमंत लोक त्याचा वारा घेत असतील; पण पिसांचे सौंदर्य? ते किती जणांनी अनु-भवले असेल? माझीच गंमत बघा ना. मी पिसाशी खेळलो होतो परंतु त्याच्या ठिकाणी असलेल्या सौंदर्याची जाणीव मला तरी कुठं झाली होती? माझी मैत्रीण पुस्तकात ही खूण विसरली नसती, तर मलासुद्धा मोरपिसातील सौंदर्य पाहायला मिळाले नसते! अर्थात तिचे आभार मला मानायलाच हवेत.

**अभ्यास :**

१. आपल्या मैत्रिणीचे आभार मानायलाच हवेत, असे लेखकाला का वाटले?
२. 'केवळ रंगांची कलाकुसर दाखवण्याकरताच सृष्टीने मोराचे पीस निर्माण केले असावे.' असे का म्हटले आहे?
३. मोरपीस आपल्याशी कसे खेळते?
४. फुलांचे सौंदर्य कशाकशांत प्रकट होते?
५. मोरपीस व फुले यांशिवाय सृष्टीतील आणखी कोणत्या गोष्टींचा उल्लेख लेखकाने केला आहे?
६. तुमच्या अवतीभवती आणखी कोणत्या सुंदर गोष्टी तुम्हांला आढळतात?
७. 'क्वचितच आपण उघड्या डोळ्यांनी सृष्टीकडे पाहतो.' असे लेखक का म्हणतो?





# गुरुनानक

.१७.

**न. वि. गाडगीळ**

**न. वि. गाडगीळ (जन्म : १८९६, मृत्यू : १९६६.) यांनी विविध प्रकारचे लेखन केले आहे. 'साल गुदस्त', 'शिखांचा इतिहास', 'पथिक' इत्यादी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. पुढील उतारा 'शिखांचा इतिहास' या पुस्तकातून संक्षिप्त करून घेतला आहे.**

**हिंदू व मुसलमान समाजांत स्नेहभाव व ऐक्य निर्माण व्हावे, म्हणून गुरुनानक यांनी शीख पंथाची स्थापना केली. या पाठात त्यांच्या जीवनकार्याचा श्री. गाडगीळ यांनी अल्पसा परिचय करून दिला आहे.**

इसवी सन १४६९ मध्ये तलवंडी गावी गुरुनानक यांचा जन्म झाला. मेहता कळूचंद हे नानकांच्या पित्याचे नाव. कळूचंद हे छोटे व्यापारी होते. नानक सात वर्षांचा झाल्याबरोबर शाळेत जाऊ लागला. तलवंडी गावाला भेट देणाऱ्या साधुसंतांबरोबर राहावे, त्यांच्यापासून ज्ञान प्राप्त करावे व नंतर आसपासच्या अरण्यात जाऊन चिंतन करावे; याप्रमाणे नानकाचा उपक्रम होता. नऊ वर्षांचा होताच मनात चाललेली खळबळ त्याने आपल्या आईवडलांना सांगितली.

भक्तिभाव हा लहानपणापासूनच त्याच्या जीवनात ओतप्रोत भरलेला होता. पंडित गोपाळ पांडे हे त्याचे शिक्षक त्याला मनापासून शिकवत होते. तीन वर्षे गोपाळ पांडे यांच्याजवळ शिक्षण घेतल्यानंतर पंडित ब्रजनाथ शर्मा यांच्याजवळ संस्कृत शिकण्यासाठी त्याला धाडण्यात आले.

याप्रमाणे शिक्षण चालू असताना क्षत्रिय धर्माप्रमाणे नानकाचे उपनयन करण्याचे त्याच्या वडलांनी ठरवले. यज्ञमंडप तयार झाला. पंडित लोकांनी मंत्र उच्चारण्यास सुरुवात केली. स्त्रिया मंगलगीते गाऊ लागल्या व जेव्हा पुरोहित हरदयाळ याने जानवे घालण्यास सांगितले, तेव्हा नानक म्हणाला, "ज्याच्यामध्ये दयारूपी कापूस असेल, संतोषरूपी सूत असून जे कधीच तुटणार नाही, जे कधी मलिन होणार नाही, जे जाळलं जाणार नाही असं जानवं मला दया."

जानव्याचा अर्थ न समजता सर्वत्र ढोंग व अहंमन्यता दिसून येत होती आणि म्हणून जेव्हा नानकाने जानवे घालण्याचे नाकारले त्या वेळी गोंधळ झाला. कोणी त्याला अहंकारी म्हणू लागले; कोणी त्याला वेडा म्हणू लागले. तथापि त्याने आपला हट्ट सोडला नाही.

मुलाच्या या वर्तनासंबंधी वडलांच्या मनात एक चिंता उत्पन्न झाली. निरनिराळ्या गोष्टी त्यांच्या कानावर येऊ लागल्या. तथापि शिक्षणाकडे मुलाचे लक्ष नाही ही गोष्ट त्यांच्याही लक्षात आली. ते स्वतः संसारी वृत्तीचे व साहजिकच संग्रही वृत्तीचे होते. मुलाने चांगला संसार करावा, व्यापार करावा, नाव कमवावे ही त्यांची महत्त्वाकांक्षा होती. एका जागी बसून तासन्‌तास कसलेतरी चिंतन करणारा हा मुलगा त्यांच्या चिंतेचा विषय झाला. नानक हा त्यांचा एकुलता एक मुलगा होता. तथापि त्याने स्वस्थ बसावे हे त्यांनाही पटत नव्हते. म्हणून त्यांनी मग घरच्या गायी जंगलामध्ये चरायला नेण्याचे काम त्यास सांगितले.

नानक जंगलात जाई व मुलांना गोळा करून त्यांना काहीतरी सांगे. परिणाम असा होई, की मुले त्याच्या गोष्टी ऐकत, त्याच्या हरिकथेने आकर्षित होत व गुरे मोकाट सुटून लोकांच्या शेतांत शिरून नुकसान करत. या सर्व तक्रारी त्याच्या वडलांच्या कानावर येत. एवढयावर भागले नाही. घरातील कोणतीही वस्तू कोणी मागितल्यास नानक ती त्यांना दयायचा. यामुळे त्यांची चिंता अधिकच वाढली. वडलांच्या मनात नानकाला शिकवावे व कोणातरी नबाबाकडे दिवाण करावे असे होते; ते तर दूरच राहिले. निदान त्याने काहीतरी व्यापार करावा म्हणून त्यांनी प्रयत्न केला. त्यातही त्यांना यश आले नाही. असे सांगतात, की कल्याणराय यांनी एकदा नानक याच्याजवळ वीस रुपये दिले आणि काहीतरी व्यापारसौदा करून चार पैसे मिळवण्यास सांगितले. तेव्हा नानक आपल्या नोकरास घेऊन शेजारच्या मंडईच्या गावी निघाला. रस्त्यात त्याला फकिरांची टोळी दिसली व त्याला कळले, की ते बरेच दिवस उपाशी आहेत. मग त्याने ती रक्कम त्या सर्वांना वाटली व घरी येऊन वडलांना सांगितले, "मी मोठा सच्चा सौदा करून आलो आहे."

काही दिवसांनी नानक यास त्याच्या मेहुण्यांकडे सुलतानपूर येथे धाडण्यात आले. त्याच्या बहिणीने त्यास सांगितले, "तू भजन-पूजन कर व इतर भानगडीत पडू नको." पण काही उद्योग न करता मेहुण्यांकडे बसून खावे हे त्याला बरे वाटेना. म्हणून त्याने काहीतरी उदयोग दया असे मेहुण्यांना सांगितले. त्यांच्या मध्यस्थीने नानकाला

दौलतखानच्या मोदीखान्यावर काम मिळाले. मोदीखान्यावर असताना जेवढे साधुसंत येत त्यांना भोजन देणे व कोणालाही कमी पडू न देणे हा उदयोग त्याने सुरू केला. तेव्हा नबाबाकडे तक्रार गेली, की नानकाच्या ताब्यात मोदीखाना ठेवल्याने भिकाऱ्यांची चैन झाली आहे. म्हणून मेहुण्यांनी नानकास आपल्या शेतीकडे पाहण्यास सांगितले. सुलक्षणी नावाच्या मुलीशी नानकाचे लग्न ठरवण्यात आले व नानक यांचा १४ व्या वर्षी विवाह झाला. संसाराच्या शृंखलेत नानक जरी बाह्यतः बांधले गेलेले दिसत होते, तरी संसारात त्यांचे लक्ष नव्हते. सकाळी चार वाजल्यापासून दीनदुःखी, साधुसंत यांच्या संगतीत मुख्यत्वेकरून ते राहात व मोदीखान्याचे थोडे काम करत. लहानमोठी मंडळी आदरभावाने त्यांच्याकडे पाहू लागली. विद्वान मंडळीही त्यांच्याशी चर्चा करण्यासाठी येऊ लागली. घरातील अडचणी वाढू लागल्या आणि शेवटी एक संसार तरी केला पाहिजे, नाही तर परमार्थाच्या तरी मार्गाला लागले पाहिजे, याचा निर्णय करण्याची वेळ आली.



एक दिवस सर्वस्वाचा त्याग करून नानक फकीर झाले. उत्तर, दक्षिण, पूर्व व पश्चिम असे सर्व भारतभर त्यांनी भ्रमण केले. हिंदू, मुस्लीम, बौद्ध इत्यादी धर्मांच्या मंदिरांना, मशिदींना, मठांना व तीर्थांना भेटी दिल्या.

हा यात्राक्रम त्यांनी तीस वर्षांपर्यंत केला.

हरिद्वार येथे ते गेले असताना तेथे क्रियाकर्म करणारे लोक त्यांनी पाहिले, तेव्हा त्यांनी गंगेचें पाणी ओंजळीने पूर्वेकडे न फेकता पश्चिमेकडे फेकून अर्घ्य देण्यास सुरुवात केली. त्या वेळी पंडितांनी त्यांना विचारले "तुम्ही हे अधर्मकृत्य का करता ?" त्यांनी उत्तर दिले, "येथून दोनशे मैलांवर माझे शेत आहे. त्याला मी गंगेचे पाणी देत आहे." त्यावर पंडितांनी सांगितले, "दोनशे मैलांवरील गावास हे पाणी कसे जाईल? केवळ मूर्खपणाचे हे कृत्य आहे." त्यावर नानक म्हणाले, "येथे केलेलं पिंडदान व तिलांजली परलोकात पितरांना जर पोचत असेल तर मी दिलेलं पाणी माझ्या शेतापर्यंत का पोचू नये ?"

तात्पर्य, जेथे जेथे ते जात तेथे तेथे अवडंबर व ढोंगी प्रकारांना ते विरोध करून सन्मार्गाचा उपदेश करत.

हे पहिले यात्रापर्व बारा वर्षे चालले होते.

गावी परतल्यावर गावात न जाता गावापासून काही मैल दूर अशा एकांत स्थानात ते राहू लागले. त्यांच्या आईवडलांनी त्यांना विरक्तपणा सोडून घरी येऊन राहण्यास सांगितले. परंतु त्यांच्या विरक्त मनावर त्याचा काही परिणाम झाला नाही. आपले आयुष्य हे काही श्रेष्ठ कार्यासाठी आहे व आपल्याला काही सिद्ध करायचे आहे या भावनेने प्रेरित होऊन थोड्याच दिवसांत त्यांनी आपली दक्षिण भारताची यात्रा सुरू केली.

याप्रमाणे सुमारे तीस वर्षे नानक यांनी नाना देश व नाना तीर्थस्थाने पाहिली. केवळ भारतातीलच नव्हे तर भारताबाहेरील अरब, इराण, काबूल, कंदाहार त्याचप्रमाणे तिबेटपर्यंतचा प्रदेश त्यांनी पाहिला. नाना तऱ्हेचे अनुभव घेतले; साहजिकच त्यांचा दृष्टिकोन विशाल झाला. मन व्यापक बनले. आणि कोठेतरी आता स्थायिक व्हावे या दृष्टीने कर्तारपूरची त्यांनी स्थापना केली.

कर्तारपूरला आल्यानंतर यात्राप्रसंगाने स्वीकारलेला यतिवेश अगर फकिराची कफनी याचा त्यांनी त्याग केला. त्यांनी आपल्या ध्येयानुसार या जगामध्ये परमार्थाबरोबर प्रपंचही इभ्रतीने व संतोषित मनाने केला. तिथे त्यांनी एक आदर्श जीवन घालवले. स्वतःच्या उदाहरणाने त्यांनी आपल्या अनुयायांनी कसे जगावे याचा आदर्श घालून दिला. भल्या पहाटे उठावे, देवाची प्रार्थना म्हणावी, प्रभुसंगीत गावे, गुरुवाणी ऐकावी, पाठ म्हणावा, प्रपंचाचे काम करावे, दिवस संपताच नियमाने प्रार्थना करावी, एकत्र

लंगरमध्ये जेवावे, पंक्तिप्रपंच करू नये आणि सर्वत्र समान भाव ठेवावा. याप्रमाणे स्वतःच्या आचरणाने दिलेला आदेश प्रभावी होत होता. अनेक भक्त त्यांच्या आयुष्याच्या अखेरच्या प्रहरात नित्य त्यांच्या सेवेत असत. हे सर्व भक्त एकमेकांस भाईभाई समजत. यांत हिंदू होते, मुसलमान होते, श्रीमंत होते व गरीबही होते.

नानकांच्या निधनानंतर हिंदु-मुसलमान भक्तांमध्ये नानक यांच्या शरीराची काय व्यवस्था व्हावी याबद्दल झगडा सुरू झाला. हिंदूंचे म्हणणे त्यांच्या देहाला अग्नि-संस्कार व्हावा; तर मुसलमानांचे म्हणणे दफन व्हावे. या तंटयाचा निकाल गुरु-नानक यांनी आपल्या हयातीतच दिला होता. त्यांनी असे सांगितले होते, की मृत्यूनंतर दोन्ही जमातींनी त्यांच्या मृत शरीरावर फुले वाहावीत आणि चोवीस तासांनंतर ज्यांच्या बाजूची फुले ताजी राहतील त्यांनी मृत शरीर घ्यावे व अंत्यसंस्कार करावेत. नानक यांचे प्राणोत्क्रमण संवत १५९५ (इ. स. १५३८) मध्ये आषाढ शुक्ल दशमी रोजी झाले. त्यांच्या आज्ञेप्रमाणे दोन्ही जमातींनी फुले वाहिली व दुसऱ्या दिवशी जेव्हा वरचा कपडा उचलला त्या वेळी सर्व फुले ताजी होती !

मोदीखाना–धान्याची कोठी.

अभ्यास :

१. नानकांच्या वडलांच्या मनात कोणती चिंता निर्माण झाली ? का ?

२. नानकांच्या वडलांना आपल्या मुलाबद्दल कोणत्या अपेक्षा होत्या ?

३. गुरुनानकांनी स्वतःच्या उदाहरणाने कोणता आदर्श आपल्या अनुयायांना घालून दिला ?

४. खालील शब्दांना प्रतिशब्द द्या :
उपक्रम, उपनयन, अहंमन्यता.

५. खालील वाक्ये योग्य शब्द घालून पूर्ण करा :
(अ) इसवी सन १४६९ मध्ये ···· गावी गुरुनानक यांचा ···· झाला.
(आ) नानक म्हणाले, 'ज्याच्यामध्ये...कापूस असेल,...सूत असून जे कधीच...नाही, जे कधी...होणार नाही, जे...जाणार नाही असं जानवं मला द्या !'
(इ) एका जागी बसून तासन्‌तास कसले तरी...करणारा हा मुलगा त्यांच्या...विषय झाला.





.१८.

# प्लास्टिक

भालचा केळकर

प्रा. भालचा केळकर (जन्म : १९२०.) हे विज्ञानाचे प्राध्यापक असून यांनी विज्ञानविषयक लेखन केले आहे. पुढील पाठ त्यांच्या 'कशापासून काहीतरी' या पुस्तकातून घेतला आहे.

चालू युग हे विज्ञानाचे युग आहे. या युगात अनेक नवे नवे शोध लागत आहेत. मानवाचे आयुष्य सुखी व्हावे म्हणून शास्त्रज्ञ अविरत प्रयत्न करत आहेत. लोखंड, कोळसा, तेल आणि वीज यांचा शोध लागल्यापासून मानवाच्या दैनंदिन जीवनात किती तरी बदल होत आहेत! प्लास्टिकचा शोध लागल्याने मानवी जीवनात कोणते बदल घडून येत आहेत हे इथे सांगितले आहे.

कोळसा, हवा आणि पाणी यांसारख्या अगदी सामान्य वस्तूंपासून प्लास्टिक मिळते आणि तेसुद्‌धा अगदी छान! पारदर्शक! सुंदर नक्षीकाम असणारी निरनिराळी उपकरणे आणि वस्तू पुरवणारे रंगीत प्लास्टिक आपल्या चकचकीत स्वरूपात आपल्यापुढे उभे राहते.

कोळसा, हवा आणि पाणी यांच्यापासून तयार झालेली अद्‌भुत वस्तू म्हणजे 'अमिनो प्लास्टिक'.सामान्य जनांच्याच नव्हे, तर शास्त्रज्ञांच्याही जगात ही एक नवलाईची गोष्ट आहे. हे प्लास्टिक पारदर्शक होईल आणि त्याचा उपयोग करून चिनीमातीच्या किंवा काचेच्या वस्तूंपेक्षाही जास्त टिकाऊ आणि उपयुक्त वस्तू तयार करता येतील आणि त्या त्यांच्या चिवटपणामुळे जास्त लोकमान्य होतील; हव्याहव्याशा वाटतील. काचेच्या पारदर्शकतेचे सारे गुण प्लास्टिकमध्ये असून 'जपून! काचसामान आहे, फुटेल.' अशी सूचना न देता खुशाल एका ठिकाणाहून सुरक्षितपणे दुसरीकडे याच्या वस्तू नेता येतात. उकळत्या पाण्याने काचेच्या वस्तूंना तडा जाऊन त्या निकामी होतात; पण पाणी उकळते असो अथवा बर्फासारखे थंड असो, हे 'अमिनो प्लास्टिक' मात्र त्याला तोंड देऊन टिकून राहते.

चिनीमातीच्या वस्तूंपेक्षा या प्लास्टिकच्या वस्तू स्वस्तही पडतात. त्यामुळे या प्लास्टिकपासून तयार केलेल्या चहासामानाला बाजारात फार मोठ्या प्रमाणावर मागणी

आली. तसेच मोटारीसारख्या वाहनांना न फुटणारी तावदाने लावण्यासाठीही अशा पारदर्शक प्लास्टिकचा उपयोग करण्यात येऊ लागला आहे.

शुद्ध 'अमिनो प्लास्टिक'च्या राळेपासून ओतीव भांडी, बाटल्या, पेले तयार करता येतात आणि ते हुबेहूब काचेसारखे दिसतात. कार्बामाइड ही प्लास्टिकची न फुटणारी काचसदृश वस्तू खऱ्या काचेपेक्षा जवळजवळ निमपटीने हलकी असते आणि सूर्य-प्रकाशातील अतिनील अशा किरणांना खुशाल आपल्यामधून जाऊ देते.

शुद्ध 'अमिनो प्लास्टिक'च्या राळेत कापूस किंवा तत्सदृश पदार्थांचा भराव घातला तर त्या पदार्थांपासून जवळजवळ अपारदर्शक आणि अर्धपारदर्शक वस्तू तयार करता येतात. सुंदर पेले, थाळ्या, बशा, डब्या अशा नाना प्रकारच्या बहुरंगी, पारदर्शक अथवा अर्धपारदर्शक वस्तू तयार झालेल्या दिसतात. या साऱ्या वस्तू अगदी उकळत्या पाण्यात बुडवल्या किंवा खाली जमिनीवर फेकल्या तरी फुटत नाहीत. द्रवराळेत जर भरपूर भराव घातला तर पूर्णपणे अपारदर्शक पदार्थ तयार करता येतो. याचा उपयोग विद्युत-उपकरणे, रेडिओचे निरनिराळे भाग, फर्निचर, रासायनिक कामासाठी लागणारे तराजू, भिंतीवर अथवा जमिनीवर आवरण घालण्यासाठी लागणारे मोठे तक्ते या वस्तू तयार करण्यासाठी होतो.



लोखंडाशिवाय इतर धातूंच्या वस्तूंसाठी पर्यायी वस्तू म्हणून 'अमिनो प्लास्टिक'च्या वस्तू फार उपयुक्त असतात. विशेषतः नळ तयार करण्यासाठी याचा चांगला उपयोग होतो. पितळेच्या नळापेक्षा हे नळ शेकडो पटीने हलके असतात. ते गंजत नाहीत. धातूंच्या नळापेक्षा जास्त दिवस टिकतात आणि दिसतातही जास्त आकर्षक.

कापसाच्या धाग्यावर जर 'अमिनो प्लास्टिक'च्या द्रवराळेचा थर देऊन तो धागा वाळवला आणि १३०° सें. ला तापवला तर लोकरीच्या धाग्यासारखा मऊ, चिवट आणि न चुरगळणारा धागा तयार होतो. दमट हवा आणि कसर यांचा या धाग्यावर काहीही दुष्परिणाम होत नाही. याचा उपयोग कापड तयार करण्यासाठी होतो. त्या कापडाचे कपडे करण्यापासून ते खुर्च्यांचे कापड, सोफ्यावरील आवरण, भिंतीवरील सजावट यांसाठी होऊ शकतो. हा धागा व त्याचे कापड अगदी स्वच्छ धुता येते. धूळ अथवा रंग हे याला चिकटू शकत नाहीत. याच्यापासून तयार केलेल्या टेबलक्लॉथवर शाई सांडली तर ओल्या फडक्याने ती सरळ पुसून काढता येते. अलीकडे तर फर्निचर तयार करणाऱ्या कारखान्यांनी या प्लास्टिकचा उपयोग खुर्च्या आणि टेबले तयार करण्यासाठी सर्रास सुरू केला आहे. कुठल्याही भडक अथवा सौम्य रंगात हे प्लास्टिक मिळत असल्याने याचे अगणित उपयोग आहेत आणि दर वर्षी नवे नवे उपयोग सापडत आहेत.

या प्लास्टिकच्या पारदर्शक अथवा अर्धपारदर्शक तक्त्याच्या तबकड्या कापून त्यांना रंग देऊन त्यांचा उपयोग वाहतुकीचे नियंत्रण करणाऱ्या दिव्यांना काचा लावण्यासाठी होतो. फोटोग्राफीत विशिष्ट किरण गाळून फोटो काढण्यास लागणारी गाळणी-काच म्हणूनदेखील यांचा उपयोग करतात. वैमानिकांना रात्री विमान चालवत असताना लागणारे विशिष्ट तऱ्हेचे चष्मे तयार करण्यासाठी या प्लास्टिकचा उपयोग होतो. रंगीत प्लास्टिकचे एकावर एक असे पातळ थर देऊन या चष्म्याच्या काचा तयार करतात. उजेडाच्या खोलीतून एकदम अंधाऱ्या भागाकडे पाहताना वैमानिकांना अंधाराशी दृष्टी सरावायला जो वेळ लागतो तो या चष्म्यामुळे पुष्कळच कमी होतो. तसेच रात्रीच्या अंधारात जो किंचित प्रकाश पसरलेला असतो, त्यातही दृष्टी सरावायला या चष्म्यांचा उपयोग होतो.

अगदी पुरातन काळापासून माणसाला हिरे-माणकांची आवडच नव्हे, तर आकर्षणही आहे. लाल, माणिक, नीळ, पाचू, पुष्कराज इत्यादी मौल्यवान जवाहीर पृथ्वीच्या अंतरंगातून तो प्रत्यही उकरून काढतो आहे. रंगहीन पण तेजस्वी हिऱ्यांपेक्षाही काही वेळा त्यांना जास्त मोल पडते. 'अमिनो प्लास्टिक' या पारदर्शक रसायनाने अगदी कमी किमतीत खऱ्याइतकीच लोभनीय किंबहुना त्याहूनही जास्त आकर्षक माणके माणसाला बहाल केली. माफक किमतीत हौस पुरवणारा हा प्लास्टिक-माणकांचा व्यवसाय फारच फोफावला आहे.

अशा बहुगुणी 'अमिनो प्लास्टिक'पासून तयार केलेल्या बहुविध वस्तू अगदी पूर्णपणे आरोग्यरक्षक आहेत. साबणाच्या पाण्याने अथवा गरम पाण्याने त्या स्वच्छ धुता येतात; शिवाय त्या गंजत नसल्याने त्यांच्यापासून आरोग्याला यत्किंचितही धोका पोचत नाही. त्याचप्रमाणे त्या वस्तूंचा आकर्षकपणा कधीही लोप पावत नाही.

असे हे 'अमिनो प्लास्टिक' पंचवीस वर्षांपूर्वी अस्तित्वात आले आणि त्याची निर्मिती गेल्या पंचवीस वर्षांत पन्नास पटीने वाढली. कारणे अगदी साधी—पारदर्शकता, तयार करण्याची साधी कृती, कुठलाही रंग सहज स्वीकारण्याची त्याची तयारी आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे त्याच्या सिद्धतेसाठी लागणारा, अत्यंत स्वस्तात मिळणारा कच्चा माल.

कोळसा आणि पाणी यांपासून फॉर्मालिन तयार होते व कोळसा, पाणी आणि हवेतील नैट्रोजन यांपासून कार्बामाइड तयार होते. फॉर्मालिन व कार्बामाइड यांपासून शेवटी अद्‌भुतगुणी 'अमिनो प्लास्टिक' निर्माण करून शास्त्रज्ञांनी अक्षरशः रासायनिक जादुगिरी केली आहे. नाही तर कुठे कोळशाचा काळेपणा, हवेचा विरळपणा आणि पाण्याची रंगहीनता आणि कुठे त्यांपासून तयार झालेल्या 'अमिनो प्लास्टिक'च्या रंगातील विविधता, आकर्षकता आणि उपयुक्तता! मातीतून मोती निर्माण करण्यासारखीच ही किमया झाली. मुळात ज्या गुणांचा थांगपत्ता नाही, त्या गुणांनी युक्त अशी वस्तू तयार करण्यासाठी केलेला हा मानवी प्रयत्न खरोखरच कशापासूनही काहीतरी निर्माण करण्याचाच खटाटोप नाही तर काय?



**अभ्यास :**

१. प्लास्टिकच्या वस्तूंचे लोकांना अधिक आकर्षण का वाटावे?

२. शुद्ध अमिनो प्लास्टिकचा उपयोग कोणत्या गोष्टींसाठी होतो?

३. भराव घातलेल्या प्लास्टिकपासून कोणत्या वस्तू तयार करतात?

४. माहिती मिळवा :
प्लास्टिकपासून धागा कसा तयार करतात? त्याचे वैशिष्ट्य कोणते? प्लास्टिक कोणत्या वस्तूंपासून तयार करतात? ते कसे तयार करतात?

५. वाक्यांत उपयोग करा :
लोभस, अक्षरशः, सिद्धान्त, थांगपत्ता, खटाटोप.





.१९.

# शिल्पसौंदर्य

माधवराव बागल

माधवराव बागल (जन्म : १८९५.) हे लेखक, चित्रकार, पत्रकार व सामाजिक कार्यकर्ते आहेत. यांनी विविध प्रकारचे लेखन केले आहे. त्यांची 'कला आणि कलावंत', 'बंधनात' ही व इतरही काही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

निर्जीव दगडमातीतून जिवंत व भावपूर्ण कलाकृती निर्माण करणे जितके अवघड, तितकेच त्यांचे योग्य रसग्रहण करणेही अवघड. पुण्यातील शिवाजीमहाराजांचा पुतळा ही श्री. करमरकरांची एक श्रेष्ठ कलाकृती आहे. या पुतळ्याचे सौंदर्य श्री. माधवराव बागल यांनी येथे उलगडून दाखवले आहे.

हे चित्र छत्रपती शिवाजीमहाराजांचे आहे. हे तुमच्या परिचयाचे आहे. राजा रविवर्मा या प्रसिद्ध चित्रकाराने त्यांचे एक घोड्यावरचे रंगीत चित्र काढले. त्या चित्राच्या हजारो प्रती छापल्या. त्या घरोघरी लावल्या गेल्या; त्यामुळे शिवाजी-महाराजांच्या चेहरेपट्टीची ओळख सर्वांना झाली. ते अणकुचीदार नाक, ती दाढी, तो अंगरखा म्हणजे शिवाजीमहाराज ही कल्पना लोकांच्या मनात रुजली.

चेहरेपट्टीने त्यांची ओळख पटली; पण तेवढ्याने त्यांचे चरित्र कसे समजून येणार? हे काम लेखणी चालवणाऱ्या लेखकाचे. लेखक व्यक्तीचे सारे आयुष्य वाचकांपुढे ठेवतो. चित्रकार त्या आयुष्यातला एखादा प्रसंगच फक्त दाखवू शकतो. तो आपल्या कुंचल्याने 'कल्याण खजिन्याची लूट' दाखवील किंवा 'राज्याभिषेका'चा प्रसंग रंगवील; पण असे अनेक प्रसंग लेखक शब्दांच्या साहाय्याने रेखाटू शकतो. चित्रकाराला तसे करता येत नाही; त्यांतला एखादाच प्रसंग तो दाखवू शकतो. यापुढे त्याची मजल जात नाही; पण वाचता येणाऱ्या माणसाला चित्रामुळे त्याच्या आयुष्यातील प्रसंगांची ओळख करून देता येते. शिल्पकाराचे काम हे त्याहून अवघड. दगडात व धातूत खोदून त्याला हे सर्व दाखवावे लागते.

लेखक सारे लिहून काढतो. चित्रकार एखादाच प्रसंग रंगवून दाखवतो. शिल्पकार मूर्ती तयार करतो आणि माणसाची ओळख आणि चरित्र सारांशाने दाखवण्याचा

प्रयत्न करतो. हे काम फार कठीण; पण हे अवघड काम शिवाजीमहाराजांचा पुतळा तयार करणाऱ्या शिल्पकार करमरकरांनी फार यशस्वी रीतीने पार पाडले आहे.



शिवाजीमहाराजांचे पुतळे अनेक शिल्पकारांनी आपल्या कल्पनेप्रमाणे तयार केले आहेत. पण माझ्या मते पुण्यातील त्यांचा अश्वारूढ पुतळा सर्वांहून सरस आहे. त्या पुतळ्यात त्यांनी शिवाजीमहाराजांच्या चरित्राचा सारांश दिला आहे व तो चांगला साधला आहे. शिवाजीमहाराज हे थोर पुरुष होते. त्यांना 'राष्ट्रपुरुष' म्हणून आम्ही पूज्य मानतो.

लेखकाने शिवाजीमहाराज फार थोर होते असे लिहिले असते. चित्रकाराने आपल्या चित्रात इतर माणसांहून ते मोठे आहेत, हे दाखवण्याकरता त्यांच्या चित्राला अधिक उठाव दिला असता. पाहणाऱ्याचे डोळे त्यांच्या चित्राकडे खेचून नेले असते. शिवाजीमहाराजांकडेच लक्ष जावे अशी चित्राची मांडणी केली असती. इतर व्यक्तींहून ते मोठे आहेत असे दाखवले असते.

करमरकरांनी महाराजांची मूर्ती अती भव्य अन रुबाबदार तयार करून त्यांचा थोरपणा व्यक्त केला आहे. मनावर परिणाम होईल अशी रचना केली आहे.

शिवाजीमहाराज हे थोर पुरुष होते. लढवय्ये होते. त्यांनी राज्यपद मिळवले. त्या राज्याचे रक्षण करण्यासाठी ते सदा जागरूक असत. शत्रूवर चाल करण्यास सदा सज्ज असत. या साऱ्या गोष्टी इतिहासकारांनी अनेक पाने लिहून पटवल्या असत्या. शिल्पकाराने धातूच्या मूर्तीत या गोष्टी सारांशाने दाखवल्या आहेत—हेच या पुतळ्याचे वैशिष्ट्य.

शिवाजीमहाराज हे घोड्यावर बसलेले दाखवले नसते, तर ते एखाद्या साध्या सैनिकासारखे वाटले असते! ढाल, तलवार व अंगरखा घातला असता, तर फार तर किल्लेदारासारखे वाटले असते! त्या किल्लेदाराचे काम मग राज्याचे रक्षण करण्या-

ऐवजी किल्ल्याची राखण करणे एवढेच! शत्रूवर चाल करण्यासाठी त्याला मोकळीक राहिली नसती. राज्यावर देखरेख करता आली नसती. तो त्या जागीच जखडून उभा राहिला असता. आज इथे तर उदया तिथे असे चहूकडे हिंडता आले नसते. निव्वळ शिवाजीमहाराजांसारखा दिसणारा व त्यांच्यासारखा पोशाख घातलेला माणूस रस्त्यावर उभा केला किंवा ठोकळ्यावर चढवला म्हणजे तो शिवाजीमहाराजांचा पुतळा होत नाही; त्यांचे चरित्र दाखवणारा तो पुतळा ठरत नाही.

ते महाराज होते म्हणून त्यांना शिपायासारखे उभे करता येणार नाही. शत्रूची स्वराज्याला नेहमी भीती. याकरता झटपट हालचाल करण्यासाठी, त्याच्यावर धावून जाण्यासाठी आणि आपल्या सैन्यावर देखरेख ठेवण्यासाठी त्यांना सतत घोड्यावर बसणेच भाग होते.

ही त्यांची तयारी शिल्पकार करमरकर यांनी या पुतळ्यात सूचकतेने दाखवली आहे. घोडा दाखवला आहे तोही चार पायांवर स्वस्थ उभा राहिलेला दाखवलेला नाही. तो पाय वर करून शत्रूवर चाल करण्याकरता तयार आहे. घोडाही राजाला शोभेसा सजवला आहे. महाराजांनी आपली तरवार म्यानातून उपसलेली आहे.

पुतळा पाहिला, की महाराजांचे चरित्र डोळ्यांसमोर उभे राहते. त्या तेवढ्या आकारात करमरकरांनी महाराजांचा उज्ज्वल इतिहास उभा केला आहे.

शिवाजीमहाराज घोड्यावर मांड टाकून सदैव सज्ज होते म्हणूनच शत्रूच्या छातीत धडकी भरली होती. त्यामुळे ते आपल्या राज्याचे रक्षण करू शकत होते. महाराज केव्हा येतील कोण जाणे, असे त्यांच्या सैनिकांना व सेनापतींना सतत वाटत असल्यामुळे ते गाफील राहात नसत. त्यामुळे सैन्य हुश्शार असे. हे सारे जीवन त्यांची कर्तव्यदक्षता, तत्परता, चपळाई, धाडसी वृत्ती या सर्व गोष्टी करमरकरांनी या पुतळ्यात साकार केल्यामुळे त्यांची ही शिल्पाकृती फार उच्च दर्जाची झाली आहे.



**अभ्यास :**

१. शिल्पकाराचे काम चित्रकाराच्या कामापेक्षा अवघड असते, हे कोणत्या गोष्टींच्या आधारे लेखकाने स्पष्ट केले आहे?

२. शिवाजीमहाराजांचा मोठेपणा पाहणाराच्या मनावर ठसावा म्हणून करमरकरांनी कोण-कोणत्या गोष्टींची योजना केली आहे?

३. तुम्ही पाहिलेल्या एखादया सुंदर पुतळ्याचे दहा-बारा ओळींत वर्णन करा. जमल्यास त्या पुतळ्याचे चित्र काढा.



.२०.

# सेवाश्रमातील एक दिवस

कृ. मु. उजळंबकर

**कृ. मु. उजळंबकर (जन्म : १९२४.) त्यांच्या 'मायेचे कढ', 'अभय' या कादंबऱ्या व इतर अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. 'सेवाश्रमातील एक दिवस' हा उतारा त्यांच्या 'अभय' या कादंबरीतून घेतला आहे.**

**अभय हा एक तुमच्याएवढाच मुलगा. शिक्षणासाठी तो सेवाश्रमात राहतो. तेथे त्याला कसे जीवन कंठावे लागले, हे पुढील पाठात सांगितले आहे.**

राजूर येथील सेवाश्रमात पाऊल टाकताच अभयला एका नवीन वातावरणाची जाणीव झाली. यादव गुरुजींचा निसर्गाच्या सान्निध्यात थाटलेला सेवाश्रम राजूर तालुक्यात प्रसिद्ध होता. निःस्वार्थी सेवक म्हणून यादव गुरुजींची प्रसिद्धी होती. हुशार आणि कर्तबगार विद्यार्थी गोळा करून निःस्वार्थी सेवेचे बीज त्यांच्या मनात रुजवण्याबद्दल आश्रमाची धडपड असे. दूरदूरच्या ठिकाणांहून अध्ययनासाठी विद्यार्थी सेवाश्रमात येत. राजूरचा सेवाश्रम हा त्यामुळे सर्वांच्या आदरास पात्र ठरला होता.

"या गोपाळराव," गोपाळरावांना पाहताच यादव गुरुजी म्हणाले, "चापोलीची काय बातमी आहे? मामांचं कुशल आहे ना?"

"हा बाबा देवांचा मुलगा–अभय. याला या आश्रमात प्रवेश द्यायचा आहे."

"चौथीच्या परीक्षेत पहिला आला ना हा?"

"होय."

अभयने खाली वाकून यादव गुरुजींना नमस्कार केला.

"फार छान झालं. बाबांच्या आत्म्यास समाधान लाभेल. मी स्वत: चापोलीस येणार होतो."

"आम्हीच आलो."

"बरं केलंत. गोपाळराव, सेवाश्रम तुमचाच आहे. अभयचं शिक्षण सेवाश्रमात व्हावं अशी बाबांची इच्छा होती."

आश्रमातील अनेक कार्यकर्त्यांनी गोपाळराव गुरुजींबद्दल धन्योद्गार काढलेले पाहून अभयचे मन प्रफुल्लित झाले. गोपाळरावांना निरोप देताना अभय म्हणाला, "गुरुजी, मी आश्रमाच्या नियमांचे पालन करीन."

गोपाळराव म्हणाले, "अभय, आरंभी थोडे कष्ट करावे लागतील. पण या आश्रमाच्या कसोटीस तू उतरलास तर आयुष्यात येणाऱ्या कसल्याही संकटास तू धैर्यानं तोंड देऊ शकशील. तुला आश्रमात पाठवताना कठोर होऊन मी हा निर्णय घेतला आहे."

गोपाळराव गुरुजींचे ते वाक्य अभय कितीतरी वेळ आपल्या मनाशी घोळवत होता. कठोर निर्णय ! कठोर निर्णय असे गुरुजी का म्हणाले ? गुरुजींच्या या वाक्यातील अर्थाची प्रचीती अभयला लवकरच आली.

गोपाळरावांनी अभयला आश्रमाच्या शिस्तीची कल्पना दिली होती. झोपताना सकाळी लवकर उठण्याचा निश्चय मनाशी करूनच तो अंथरुणावर पडला. पहिला दिवस असल्यामुळे गाढ झोप लागेल म्हणून तो जागतच राहिला. कितीतरी वेळाने कोंबडा आरवला. आश्रमाची पहिली घंटा झाली. घंटा संपते न संपते तोच सर्व विद्यार्थी आपापल्या खोलीतून बाहेर पडले. अभय तयारच होता. तोही त्या विद्यार्थ्यांत मिसळला. विद्यार्थी स्नानास निघाले तसा तोही स्नानास निघाला. थंड पाण्याने प्रथमच तो स्नान करत होता.

दुसरी घंटा झाली. सर्व विद्यार्थी प्रार्थनेस उभे राहिले.







प्रार्थना संपल्यावर भगवद्गीतेचे पाठांतर चालू झाले. अभयला पहिले दोन अध्यायच पाठ होते. विद्यार्थ्यांनी अठरा अध्याय म्हटले. आश्रमातील विद्यार्थी पाठांतरात पुढे आहेत हे अभयने ओळखले. आपल्या अज्ञानाची त्याला जाणीव झाली.

आणखी एक गोष्ट अभयला आश्रमात प्रामुख्याने जाणवली. आजपर्यंत तो आईच्या सावलीत वाढला होता. घरकामाची कोणतीच जबाबदारी त्याच्यावर नव्हती. तसा कधी प्रसंगच आला नव्हता. सेवाश्रमातील प्रत्येक विद्यार्थी स्वतः पाणी शेंदून आणत असे. स्वयंपाकही विद्यार्थीच करत. 'स्वावलंबन' हा आश्रमाचा महामंत्र होता. गुरुजी आणि विद्यार्थी दोघेही या व्रताचे पालन कटाक्षाने करत होते.

"पाणी भरायचं आहे," एक विद्यार्थी अभयला म्हणाला.

"पाणी आपल्याला भरावं लागतं?"

"होय. पाणीच काय, स्वैपाकही करावा लागतो," असे म्हणून तो म्हणाला, "अभय, उचल ती घागर."

अभयने घागर उचलली. तेवढी जाडजूड लोखंडी घागर उचलण्याचा प्रसंग त्याच्या आयुष्यात पूर्वी कधीच आला नव्हता.

"तू पाणी शेंदतोस का नेऊन टाकतोस?" अभयच्या मित्राने त्याला विचारले.

"मी आजचा दिवस शेंदतो."



"शेंदणं सोपं नाही, अभय. हाताला फोड येतील तुझ्या."

"तुझ्या हाताला फोड नाही का येणार?"

"मला सवय आहे."

"मलाही सवय होऊ दे."

अभय पाणी शेंदू लागला. हळूच त्याने पोहरा आडात सोडला. पोहरा उपडा झाला. वर उचलून त्याने परत खाली सोडला. पोहरा पाण्यात बुडला. भरलेला पोहरा खेचण्याचा प्रयत्न तो करू लागला. त्याला ते जमेना. मदतीला नारायणाला हाक मारावी असे त्याला वाटले; पण आपला दुबळेपणा दिसू नये म्हणून तो प्रयत्न करू लागला. जोर करून पोहरा ओढण्यास थोडे पुढे व्हावे, तर झोक जाईल ही भीती होती. साधा लोखंडी पोहरा; पण तो अभयची परीक्षा पाहात होता. मग मनात आईची आठवण करून त्याने नेट लावला आणि....आणि तो भराभर पाणी शेंदू लागला. कुठली तरी असामान्य शक्ती त्याच्या अंगात संचारली होती. दोन पोहऱ्यांची ती घागर त्याने भरली. भरलेली घागर घेऊन नारायण झरझर चालत गेला.

अभयला वाटले, आपल्याने ही घागर हालवणेसुद्धा होत नव्हते. दहा घागरी पाणी शेंदून तो आश्रमात आला. तो घामाघूम झाला होता.

अभय वर्गात गेला.

"लक्ष्मण, तू म्हणून दाखव काल दिलेला पाठ," यादव गुरुजी म्हणाले.

मुखोद्गत केलेला पाठ लक्ष्मण घडाघडा म्हणू लागला.

"अभय, तुला काय काय येतं? संस्कृत येतं का?"

"मला संस्कृत येत नाही. चापोलीच्या शाळेत संस्कृत शिकण्याची सोय नव्हती."

"तुला संस्कृत शिकायची इच्छा आहे?"

"आहे. गीतेचे दोन अध्याय मला पाठ आहेत."

"संस्कृत शिकण्यासाठी थोडे अधिक परिश्रम करावे लागतील."

"पडतील ते श्रम घेण्याची माझी तयारी आहे. मी मन लावून अभ्यास करीन."

दिलेला पाठ वर्गातील इतर मुलांनी म्हणून दाखवला. गुरुजींनी नवीन पाठ शिकवला. पाठ सोपा करून शिकवण्याची यादव गुरुजींची हातोटी अभयला फार आवडली. झालेला अभ्यास भरून काढण्याचा अभयने निश्चय केला.

संध्याकाळी अभय आपल्या घोंगडीवर तसाच लवंडला. तळहातावरील फोड अधिकच ठणकत होते. थकव्यामुळे त्याला पटकन झोप लागली. झोपेत तो स्वप्नाच्या

अधीन झाला. स्वप्नात आईने हळूच त्याचा हात हातात घेतला.

"अगबाई!" आई म्हणाली, "अभय, अंग गरम लागतंय."

"नाही ग आई."

"बघ किती ताप आला आहे?"

"आई, ताप वगैरे काही नाही."

"अभय, असं खोटं नाटक करू नकोस. मी ओळखते सारं. आडाचं पाणी शेंदावं लागतं ना?"

"होय आई, मी शेंदलं खरं. तूच उभी राहिलीस ना माझ्या मागं येऊन? आई, तुझं नाव घेताच इतका जड पोहरा हलका झाला बघ. मी भराभर पाणी शेंदलं."

"म्हणूनच फोड आले?"

"येऊ देत आले तर! तुलाही असेच फोड आले असतील नाही?"

"माझ्या बाळा, किती तू माझी काळजी करतोस!"

"आई, मी एवढंसं काम केलं तर तू त्याचं किती कौतुक करतेस!"

"माझ्या राजा!"

स्वप्नातल्या या जगात अभय कितीतरी वेळ आईशी बोलत होता. तो स्वप्नातच रममाण झाला....

"अभय, उठला नाहीस? घंटा होण्याची वेळ होत आली. आज स्वयंपाकाची पाळी तुझी आहे." दारावर नारायण हाक मारत होता. एवढ्यात घंटा वाजली आणि अभय ताडकन उठला.

निःस्वार्थ सेवक–कसल्याही लाभाची अपेक्षा न करता सेवा करणारा; धन्योद्‌गार–समाधानाचे उद्‌गार; प्रचीती–अनुभव, पडताळा; शेंदणे–खेचणे, ओढणे, आडातून अथवा विहिरीतून पाणी काढणे; कटाक्षाने–काळजीपूर्वक; मुखोद्‌गत–तोंडपाठ; हातोटी–कौशल्य.

अभ्यास :

१. गोपाळरावांनी अभयला आश्रमात का नेले?
२. 'कठोर होऊन मी हा निर्णय घेतला आहे.'—असे गोपाळराव का म्हणाले?
३. कोणत्या व्रताचे पालन गुरुजी व विद्यार्थी कटाक्षाने करत होते?
४. पाणी शेंदताना आईच्या आठवणीने त्याला बळ मिळाले, असे त्याला का वाटले?
५. अभय स्वप्नात आईशी काय काय बोलला? या संभाषणातून या मायलेकरांचे प्रेम कसे व्यक्त होते?
६. या पाठातून अभयच्या अंगचे कोणते गुण प्रकट होतात?
७. आश्रमातील सकाळच्या कार्यक्रमाचे वर्णन करा.



.२१.

# कश्मिरातील वसंत

ना. सी. फडके

प्रा. ना. सी. फडके (जन्म : १८९४, मृत्यू : १९७८.) यांनी कथा, कादंबरी, लघुनिबंध, प्रवासवर्णन, चरित्र इत्यादी विविध प्रकारचे व विपुल लेखन केले आहे. त्यांची 'दौलत', 'बावनकशी', 'गुजगोष्टी', 'प्रतिभासाधन', 'निबंध सुगंध', 'दादाभाई नवरोजी', ही व इतर अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. भारत सरकारने 'पद्मभूषण' ही पदवी देऊन त्यांच्या वाङ्मयसेवेचा गौरव केला आहे. पुढील पाठ त्यांच्या 'निबंध-सुगंध' या पुस्तकातून घेतला आहे.

कश्मीर हे भारताचे नंदनवनच! तिथल्या वसंत ऋतूतील निसर्गाचे सौंदर्य लेखकाने कसे टिपले आहे, ते पाहा.

"आला, ऋतू वसंत आला!"—अशी ललकारी कश्मीरच्या खोऱ्यात प्रथम ऐकू येते ती कतीज, सतुत अशा पक्ष्यांकडून. कश्मीरमधले काही पक्षी असे आहेत, की त्यांना थंड हवा सोसत नाही. कश्मिरात हिवाळा कडाकू लागला की हे पक्षी पंजाबात निघून जातात, तिकडेच तीन महिने राहतात आणि ऋतू वसंत कश्मीरकडे निघाला, की एखाद्या राजाच्या भालदारचोपदारांप्रमाणे हे पक्षी त्याच्या आगमनाची कश्मिरी लोकांना वर्दी देण्यासाठी पुढे धावत येतात. या पक्ष्यांची गोड किलबिल कानी पडली रे पडली, की कश्मिरी स्त्री-पुरुष समजतात–शिशिर ऋतू आपली बाडबिछायत गुंडाळून गेला असून वसंत ऋतूची स्वारी कश्मीरच्या दिशेनं येत आहे.

वसंत ऋतूच्या आगमनाची गोड वर्दी देणाऱ्या या पक्ष्यांची नावं कतीज, सतुत, पोषनूल, फपसीर, सोनचिचूर, चकोर अशी आहेत. यांतला चकोर आपण महाराष्ट्रीय लोकांनी फारसा प्रत्यक्ष पाहिलेला नसला तरी काव्यातून त्याचा चांगला परिचय आपल्याला झालेला आहे. हिवाळ्यात पंजाबच्या दिशेनं चालते झालेले हे सारे पक्षी आपल्या मधुर शब्दांनी वातावरण भरून सोडू लागले, की समजावं कश्मीरच्या खोऱ्यात वसंत ऋतुराजाचं अधिराज्य सुरू झालेलं आहे. मग साऱ्या सृष्टीचं रूप झपाट्यानं बदलू लागतं. हिवाळ्यात गारठून, गोठून निद्रिस्त झालेली सृष्टी जागृत होऊ लागते आणि सृष्टीच्या अंगावर उठलेले ते हर्षाचे रोमांच नाना स्वरूपांत

जिकडे तिकडे दिसू लागतात. पहाड, जलप्रवाह, वनं, उपवनं, शेतं, माळरानं, मळे अशा प्रकारे ठायी ठायी नवजीवनाचे अंकुर फुटतात. अनंत रंगांची फुलं फुलू लागतात. आकाशगर्भात फाकलेल्या प्रकाशातदेखील परोपरीच्या रंगछटा झळाळू लागतात. बगीच्याबगीच्यात केवळ काश्मीरच्या भूमीतच उगवणाऱ्या अशा अनेक जातींच्या वेलींवर कुठे तांबडी, कुठे जांभळी, कुठे पिवळी, कुठे मोत्यासारखी स्वच्छ पांढरी अशी अती नाजूक फुलं घोसाघोसांनी लगडू लागतात. गुलाबांच्या ताटव्यांत जाड मखमलीसारख्या टवटवीत पाकळ्यांच्या गुलाबांचे कलशाएवढाले कंद डोलू लागतात. सफरचंद, नाशपत, अक्रोड, बदाम अशा फळझाडांच्या आगामी बहराची सूचना देणारी तऱ्हेतऱ्हेची फुलं त्यांच्या शाखांवर प्रगट होऊ लागतात आणि त्या फुलांच्या पाकळ्यांचे सडे जागोजाग पडल्यामुळे कुरणाच्या हिरव्यागार पार्श्वभूमीवर नाना रंगांची रांगोळी काढण्याचा खेळ घडीभर करून कुणी अप्सरा भूलोकावर येऊन गेल्याचा भास होतो.

उंच उंच पहाडांच्या माथ्यावरचे बर्फाचे थर वितळून विरळ झाल्यामुळे चमचम करणाऱ्या पारदर्शक वस्त्रासारखे भासू लागतात. पहाडांचं अंग झाकणाऱ्या गर्द झाडीतल्या वृक्षांवर फुलोरा विशेष नसतो; परंतु नव्या पालवीचे कुठे गडद, कुठे फिकट असे रंग खुलून



दिसू लागतात. छोट्या आणि बड्या दल तलावात कमळाच्या हजारो वेली प्रफुल्लित होतात. त्यांची विस्तीर्ण हिरवी काळी पानं काही जलपृष्ठाखाली, काही जलपृष्ठावर तरंगताना दिसतात; आणि उंच उंच देठांवर पांढरी, निळी, तांबडी कमळं डोलताना आढळतात.

जेहलम नदीच्या दोन्ही बाजूंस कुठे कुरणात, कुठे बागेत, कुठे मळ्यात गुलाब, पंजीना, योस्मन, एशिकपंचान, खताई, कारिपत्य, लिली अशी हजार तऱ्हांची वासंतिक फुलं फुलल्यामुळे वाऱ्याचे झोत सदा सुगंधित होऊन वाहू लागतात. पक्ष्यांच्या नादमधुर शब्दांनी वातावरण गजबजून जातं.

अनंत तऱ्हांच्या फुलांची लयलूट हे कश्मिरमधील वसंत ऋतूचं खरं वैशिष्ट्य आणि वैभव. ग्रीष्म ऋतू दूर असतो त्यामुळे जेहलमच्या पात्रात अजून मुबलक पाणी असतं. छोट्या व बड्या दलमध्येही पाणी विपुल असतं. पर्वतावर हिवाळ्याप्रमाणे बर्फाचे दाट थर नसतात; पण बर्फाचं विरल आच्छादन असतंच आणि सूर्यप्रकाशात त्याचा चमचमाट जसा पाहण्यासारखा असतो त्याचप्रमाणे चांदण्यात त्याची काही एक अवर्णनीय शोभा दिसते. परंतु कश्मिरातील वासंतिक निसर्गसौंदर्याचा मुख्य भाग म्हणजे जिकडे तिकडे फुललेली फुलं! कश्मीर सरकार वसंतोत्सव मोठ्या प्रमाणावर साजरा करतं. फुलांचं प्रदर्शन भरवलं जातं. लोकगीतांचे आणि नृत्याचे कार्यक्रम होतात. ते सर्वांना खुले असतात. जेहलमच्या पात्रात परोपरीने शृंगारलेल्या मोठमोठ्या नौकांची जी मिरवणूक निघते तिचा थाट तर काही विचारूच नका!

कश्मीरचं सौंदर्य बघायला येणाऱ्या प्रवाशांची वसंत ऋतूत गर्दी उसळते व निशात, शालिमार बगीचे बघण्यासाठी त्यांच्या झुंडीच्या झुंडी लोटू लागतात. परंतु खुद्द कश्मिरी लोकांनादेखील या बगीच्यांबद्दल अनिवार प्रेम आहे. असा साधारण शिरस्ताच आहे, की रविवारचा सुटीचा दिवस सर्व लोकांनी—श्रीमंतांनीच नव्हे, तर गरिबांनी आणि खेडुतांनीदेखील–बगीच्यात वनभोजन करून साजरा करायचा. त्यामुळे बगीच्याकडे जाणारे रस्ते तर भरलेले असतातच, शिवाय दलच्या जलमार्गात शेकडो लोक शिकाऱ्यांतून निघालेले असतात. हे लोक पत्ते खेळत असतात, गाणी गात असतात, फोनोग्राफ ऐकत असतात. सुरईसारख्या उंच समूवार नावाच्या भांड्यात तयार केलेला नमकीन चहा म्हणजे साखरेऐवजी मीठ घातलेला चहा, चिनीमातीच्या बसकट पेल्यातून पीत असतात.

निशात बाग शालिमारपेक्षा लोकांना अधिक प्रिय असावी. शालिमारपेक्षा या ठिकाणी लोकांची कितीतरी अधिक गर्दी उसळलेली तुम्हांला दिसेल. तुम्ही जर

दलमधून नौकेतून आला असाल तर निशात बागेपुढल्या तलावाच्या काठाशी शिकाऱ्यांची अशी काही झुंबड उडालेली तुम्हांला दिसेल की, तुम्हांला वाटेल, तिच्यातून मार्ग काढून नावाडी आपला शिकारा काठाला लावणार कसा? परंतु शिकाऱ्यांच्या किचकट दाटीतून तुमचा नावाडी हां हां म्हणता सफाईनं वाट काढील आणि शिकारा किनाऱ्याला लावील!

सारा सवयीचा खेळ आहे. सायकलीवरून हिंडताना आपण नाही का अशक्य वाटणाऱ्या दाटीतून वाट काढत? उद्यानापुढच्या हमरस्त्यावर मोटारींची, टांग्यांची एकच थाप लागलेली तुम्हांला दिसेल. मिठाईच्या, पुरीभाजीच्या दुकानांची दाटी झालेली आढळेल. फळांचा मोसम अजूनही दूरच असेल. परंतु सुंदर ताजी सफरचंदं अगदी स्वस्त दरानं मिळतील.

शालिमार बागेला चारच मजले—यांना म्हणायचं मजगी—आहेत. पण निशात-बागेला सात आहेत. शेवटची मजगी फारच उंच असून तिच्या मागे अगदी चिकटून पर्वतांची रांग दिसते. शालिमारमध्ये एकच मंडप आहे. इथे दोन आहेत. शालिमार बाग जहांगीर बादशहानं १६१९ मध्ये तयार करवली आणि निशात बाग नूरजहान राणीचा आसफशहा यानं नंतर बांधली. हा बगीचा अधिकच मनोहर झालेला पाहून जहांगीरला विषाद वाटला आणि या बागेत येणारं पाणी त्यानं काही दिवस तोडलं होतं असं सांगतात. ही आख्यायिका खरी असो किंवा खोटी असो; एवढं खरं, की ही उद्यानं एकाच नमुन्याची असली तरी निशातची सर शालिमारला नाही! म्हणूनच मला वाटतं, लोकांची खरी प्रचंड गर्दी या उद्यानावर दिसते. या गर्दीत श्रीमंतांपेक्षा सामान्य गरीब लोकांची संख्या अधिक असते हे विशेष. अंगावर साधे, मळके, क्वचित फाटके कपडे, त्यांवर जुनी फाटकी शाल किंवा काश्मिरी घोंगडी लपेटून घेतलेली, अशा वेषात साधे खेडूत किंवा कामकरी लोक आपले मित्र किंवा आपली बायकामुलं घेऊन आलेले दिसतात आणि या मंडळींच्या तोंडावरचा उल्हास श्रीमंतांहून काकणभर अधिकच असतो. उद्यानात जिकडे तिकडे माणसांचा गजबजाट दिसेल. कुणी आस्ते कदम सहल करत असतील, कुणी कारंज्यापुढे थबकलेले दिसतील, कुणी हिरवळीवर धावणाऱ्या, अगर पुष्करणीतील पाणी एकमेकांवर उडवणाऱ्या किशोरांचा खेळ पाहत असतील, कुणी वृक्षांच्या गर्द छायेत तृणांकुरांवर खुशाल झोपलेले असतील तर कुणी वनभोजन करीत असतील. जिकडेतिकडे चहा तयार होत असेल; सारं उद्यान आनंदानं आणि समाधानानं बहरून गेलेलं असेल.

पुरुष, स्त्रिया, मुलं, म्हातारे, श्रीमंत, गरीब हे भेद या उद्यानात घटकाभर नाहीसे झालेले असतात. सारी माणसं एकाच पातळीवर आलेली असतात. क्रीडोद्यानात विहार करणारी ही सारी माणसं असतात. हे रमणीय उद्यान सगळ्यांच्या मालकीचं आहे. या ठिकाणी काश्मीरच्या वासंतिक शोभेची मजा कुणी किती लुटावी याला बंधन नाही!



अधिराज्य – साम्राज्य; कलश – कळशी, घागर; नादमधुर – मंजुळ; आच्छादन – झाकण, पांघरूण; अनिवार – फार; शिरस्ता – रिवाज, चाल; शिकारा – घरासारखी तयार केलेली होडी; उद्यान – बाग; विषाद – खेद, वैषम्य, कमीपणा; आख्यायिका – ऐकीव गोष्ट; पुष्करणी – हौद.

अभ्यास :

१. काश्मिरात वसंत ऋतूचे आगमन झाल्याची वर्दी कोण देते ?
२. वसंत ऋतूत काश्मिरातील सृष्टीत कोणते सौंदर्य प्रकट होते ?
३. दल सरोवरात त्या वेळी कोणती मौज दिसते ?
४. वसंत ऋतूत निशात व शालिमार या बागांत कोणकोणती दृश्ये दिसतात ?
५. काश्मिरातील वसंत ऋतूचे खरे वैशिष्ट्य कोणते ? या वेळी काश्मिरात कोणकोणती फुले फुलतात ?
६. काश्मिरी लोक वसंतोत्सव कसा साजरा करतात ?
७. वसंत ऋतूच्या आगमनाबरोबर महाराष्ट्रातील सृष्टीत तुम्हांला कोणकोणत्या प्रकारचे निसर्गसौंदर्य दिसते ?



.२२.

# कविभूषण

पं. महादेवशास्त्री जोशी

**पंडित महादेवशास्त्री जोशी (जन्म : १९०६.) यांनी विविध प्रकारचे लेखन केले आहे. यांचे 'भावबळ', 'कन्यादान', 'कथासुगंध' हे कथासंग्रह; 'तीर्थरूप महाराष्ट्र', 'महाराष्ट्राची धारातीर्थे' ही प्रवासवर्णने व इतरही अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. पुढील कथा त्यांच्या 'कथासुगंध' या कथासंग्रहातून घेतली आहे.**

**भूषण हे शिवकालातील एक सुप्रसिद्ध कवी होते. त्यांच्या जीवनाचा परिचय या पाठात लेखकाने करून दिला आहे.**

उत्तर प्रदेशातील कानपूर जिल्ह्यात यमुनेच्या काठावर तिकवांपूर नावाचे एक गाव होते. तिथे रत्नाकर त्रिपाठी नावाचा एक सत्वशील ब्राम्हण राहात होता. त्याला चार मुलगे होते. त्यांपैकी एकाचे नाव भूषण होते.

हाताची पाची बोटे सारखी असत नाहीत, तिथे चार भावंडांत सारखेपणा कुठून आढळणार! रत्नाकरांचे पहिले तीन मुलगे थोडी–फार विद्या संपादून नित्यक्रम चालवणारे होते. भूषण मात्र त्यांच्याहून अगदीच वेगळा निपजला. सर्वांत थोरला भाऊ चिंतामणी वडलांच्या मागून घरातला कर्ता पुरुष झाला होता. बाकीचे भाऊ त्याच्या आज्ञेत राहून संसाराला हातभार लावत होते. निकामी राहून तिन्ही ठाव गिळणारा होता तो फक्त एकटा भूषण.

एक दिवस सर्व मंडळी दुपारी जेवायला बसली होती. चिंतामणीची बायको सर्वांना वाढत होती. सकाळीच काही कारणावरून भूषणाची आणि थोरल्या भावाची कुरबूर झाली होती. भूषण त्याला उलटून बोलला होता आणि ते चिंतामणीच्या बायकोला आवडले नव्हते. वाढत असतानासुद्धा ती त्या रागातच होती. भूषणाने जेव्हा तिच्याकडे मीठ मागितले, तेव्हा एवढा वेळ कोंडलेली तिच्या रागाची वाफ बाहेर पडली. ती तिखट शब्दांत त्याला बोलली, "भाऊजी, कुठलं वाढायचं तुम्हांला मीठ? जेवणात मीठ म्हणजे चिमूटभर; पण तेवढं तरी कमवून आणता का तुम्ही?"

भूषण उनाड होता; पण तो कोडगा नव्हता. त्यामुळे भावजयीचे ते शब्द त्याच्या मर्माला झोंबले. राखेखाली दडलेल्या स्वाभिमानाच्या ठिणगीवर फुंकर बसली. भरले पान टाकून तो ताड्कन उठला. रागाच्या तिरीमिरीतच त्याने हात धुतले. खुंटीवरचे उपरणे खांद्यावर टाकले. घरातून बाहेर पडताना सर्वांच्या देखत त्याने भावजयीला म्हटले, "वहिनी, मी निघालो. जेव्हा मीठ मिळवून आणीन तेव्हाच या घराचं तोंड पाहीन! तेव्हाच तुझ्या हातचं जेवीन!"

गाव सुटले. रस्ता रान जवळ करू लागला. ना कुणाची सोबत ना कुणाचा धीर! एकेक पाऊल पुढे टाकताना डोक्यात विचारचक्र फिरू लागले. भविष्याची चिंता चटके देऊ लागली. वाया घालवलेल्या जीवनाबद्दल पश्चात्तापाची बोचणी सुरू झाली. विद्येवाचून मान नाही, विद्येवाचून द्रव्य नाही आणि विद्येवाचून मनुष्यपणही नाही हे प्रथम त्या दिवशी त्याला उमगले. झालेली चूक दुरुस्त करायची अन् खूप खूप शिकून मोठ्ठा पंडित व्हायचे असा त्याने निर्धार केला. तेव्हाच त्याच्या अंतराची तगमग शांत झाली. भावजयीबद्दलचा रागही मावळला.

भटकत भटकत तो एका नगरात आला. एका महापंडिताच्या घरी त्याने आश्रय मिळवला. 'रामो हरिः' पासून विद्यार्जनाला प्रारंभ केला. एका व्रात्य मुलाचे निष्ठावंत शिष्यात रूपांतर झाले. उनाडक्या करणारा भूषण अहोरात्र गुरुसेवेला सादर झाला. रोज नव्या नव्या खोड्या शिकणारा भूषण आता रोज नवे नवे विषय ग्रहण करू लागला. तो सर्वस्वी बदलला.

गुरुकृपा झाल्यावर विद्या मिळायला कितीसा उशीर? थोड्या वर्षांत तो व्युत्पन्न झाला. साहित्यशास्त्रातले जाडे ग्रंथ त्याने आत्मसात केले. त्याच्या बुद्धीला धार आली, वाणी सुसंस्कृत बनली, प्रतिभेला अंकुर फुटले आणि सहजपणे मुखातून काव्य प्रगटू लागले. त्याच्या गुरूला विद्यादान सार्थकी लागल्याचा आनंद झाला. गुरूने त्याला घरी जाण्याची अनुज्ञा दिली. एक 'दगड' या स्वरूपात गुरुगृही दाखल झालेला भूषण झळकते रत्न बनून तिथून बाहेर पडला.

पण तरीही त्याला घरी परत जावेसे वाटेना. कारण विद्या झाली तरी अजून मीठ मिळवायचे होते. त्यासाठी कोणता राजेश्वर गाठावा याचा विचार करत असता रुद्ररामाची दातृत्वकीर्ती त्याच्या कानी आली. रुद्रराम हा चित्रकूटचा राजा होता. भूषण तेथे गेला व त्याला राजाश्रय मिळाला. रोज दरबारात जावे आणि राजाला नवे नवे काव्य ऐकवावे असा क्रम सुरू झाला. राजा रसिक होता. धार्मिकही होता. भूषण

त्याच्याभोवती नित्य नवे वातावरण उभे करत होता. कल्पनेच्या यक्षभूमीतून त्याला विनपंख फिरवून आणत होता. रुद्रामाला वाटले, की याच्या शब्दसंपत्तीपुढे आपली हिरेमाणकांची दौलत तुच्छ आहे. भूषणाची कीर्ती हळूहळू पसरू लागली. त्याची कविता रसिकांच्या जिव्हाग्री नाचू लागली. 'हा कोण नवा कवी!' म्हणून आसपासच्या पंडितांनी उत्सुकता दाखवली.

पण भूषणाला तिथे फार दिवस करमले नाही. एक दिवस त्याने राजाकडे घरी जाण्याची परवानगी मागितली. राजाने ती नाखुषीनेच दिली. त्याने भूषणाच्या सन्मानार्थ एक मोठा दरबार भरवला. सर्वांच्या समक्ष 'कविभूषण' अशी त्याला पदवी दिली. महावस्त्र व मोठी दक्षिणा देऊन त्याला गौरवले.

भूषण तिथून निघाला तो थेट दिल्लीला आला. तिथे त्याला त्याचा थोरला भाऊ भेटला. गृहत्याग करून निघालेला आपला भाऊ पंडित होऊन आपल्याला भेटला म्हणून चिंतामणीला परम समाधान झाले. आपल्या धाकट्या भावाला हृदयाशी कवटाळताना त्याचे डोळे आनंदाश्रूंनी भरले. चिंतामणीने त्याला दिल्लीपती औरंगजेबा-कडे नेले व त्याचा परिचय करून दिला. त्याने भूषणाची कविता ऐकण्याची इच्छा दाखवली. भूषणाने काव्यगायनाला प्रारंभ केला. त्याची खडी वाणी धबधब्यासारखी घोंगावू लागली. ती वीरगाथा ऐकता ऐकता त्या दरबारात वीररसाचा पूर आला. श्रोत्यांची अंतःकरणे क्षणाक्षणाला थरारू लागली. बादशहावर मात्र काही परिणाम दिसत नव्हता. तो अगदी स्तब्ध बसून होता.

अखेर शब्दाचे सामर्थ्य विजयी ठरले. बादशहा नकळत त्या काव्याशी तदाकार झाला. त्याच्या शरीरातील नस अन नस तटतटू लागली. छाती फुगली, डोळे तांबारले आणि आपला हात केव्हा वर येऊन तो मिशीचे आकडे कुरवाळू लागला ते त्याला कळलेच नाही.

"बहोत खूब!" बादशहा आनंदून उद्गारला. इतकेच नव्हे तर वस्त्रालंकार देऊन त्याने भूषणाचा बहुमान केला. त्याला आपल्या दरबारी ठेवून घेतले. दिवसेंदिवस दिल्लीच्या दरबारात त्याची प्रतिष्ठा वाढू लागली.

त्यानंतर काही कालाने एक रोमहर्षक प्रसंग घडला. औरंगजेब दरबारात बसला होता. भूषणासह सगळे आश्रित कवी आपापल्या स्थानी विराजले होते. बादशहाला काय लहर आली कोणास ठाऊक! तो कविराजांना म्हणाला, "तुम्ही तोंडपुजे आहा. माझी खोटी बढाई तुम्ही वर्णिता अन् मला खुष करू पाहता; मला हे मुळीच आवडत नाही. मी जसा आहे तसं माझं वर्णन करा. माझं वास्तव चित्र रेखाटा."

या सरबत्तीने बाकीचे सगळे कवी गांगरले, कारण बादशहाचे यथातथ्य शब्दचित्र रेखाटणे म्हणजे मरण आवंतून आणणे. कोण या गोष्टीला तयार होईल? सगळे बिचारे खाली माना घालून बसले. मान ताठ ठेवून बादशहाच्या डोळ्याला डोळा भिडवला तो एकट्या भूषणाने.

"खाविंद! आपलं आव्हान मी स्वीकारतो. ऐका आपलं यथातथ्य वर्णन." असे बोलून त्याने ताबडतोब कविता रचली व ती खड्या सुरात म्हटली. त्यात बादशहाच्या जुलमी कृत्याची उघड उघड निर्भर्त्सना होती. मनात साठलेली सगळी मळमळ त्याच्या त्या काव्यातून बाहेर पडली होती. ती ऐकून सर्वांची हृदये हबकली. बादशहाच्या



नेत्रांतून अंगार वर्षू लागला. संतापाने बेभान होऊन तो भूषणाला ठार करायलाच उठला. पण भूषण आपल्या जागेवरून तसूभरही हालला नाही. प्राणाचे मोल देण्याच्या तयारीनेच तो ते झणझणीत कवित्व वदला होता. काही प्रतिष्ठित दरबारी लोक मध्ये पडले आणि त्यांनी बादशहाला आवरले, म्हणून भूषणाचे मरण थोडक्यात टळले.

त्याच क्षणी त्याचा राजाश्रय तुटला. त्याला त्याची थोडीच कदर होती! त्या प्रसंगानंतर एक क्षणभरही तो दिल्लीत थांबला नाही. त्याने सरळ दखखनचा रस्ता धरला. मजल दरमजल करत तो शिवाजी महाराजांकडे आला. महाराजांनी त्याचे

प्रेमभराने स्वागत केले. तेही गुणी जनांचे चाहतेच होते. भूषण त्यांच्या पदरी राहिला. त्यांच्या पावन सहवासात त्याचा अंतरात्मा प्रसन्न झाला. त्यांचे अनेक मनसुबे त्याने ऐकले, लढाया अन् विजय डोळे भरून पाहिले आणि पुढे त्याने 'शिवराज भूषण' या नावाचा अलंकार शास्त्रावरील एक ग्रंथ लिहिला. या ग्रंथात अलंकाराची उदाहरणे देण्यासाठी त्याने शिवाजी महाराजांच्या जीवनातील अनेक प्रसंग निवडले व त्यांतून जणू शिवचरित्रच उभे केले! याशिवाय त्याने शिवाजी महाराजांच्या जीवनावर 'शिवाबावनी' या नावाचा एक स्वतंत्र काव्यग्रंथही रचला आहे.



अभ्यास :

१. भूषण उनाड असला तरी कोडगा नव्हता, हे कोणत्या प्रसंगावरून दिसून येते?

२. घर सोडल्यावर भूषणाला कोणती गोष्ट उमगून आली? तिचा काय परिणाम झाला?

३. भूषणाला 'कविभूषण' ही पदवी कोणी व केव्हा दिली?

४. भूषणाला औरंगजेबाच्या आश्रयाला का मुकावे लागले?

५. भूषणाचा अंतरात्मा खरा प्रसन्न झाला तो केव्हा? ते कशावरून?

६. अर्थ सांगा :
   व्युत्पन्न, प्रतिभा, दातृत्वकीर्ती, रोमहर्षक, यक्षभूमी, निर्भर्त्सना.

७. वाक्यांत उपयोग करा :
   मर्माला झोंबणे, अहोरात्र, सार्थकी लागणे, जिव्हाग्री नाचणे, तदाकार होणे.





.२३.

# जिकडे धर्म तिकडे जय!

कृ. ल. सोमण

कृ. ल. सोमण : (जन्म : १८६५, मृत्यू : १९४५.) यांनी 'कुरुभंग,' 'पानपतचा दुर्दैवी मोहरा,' इत्यादी पौराणिक व ऐतिहासिक नाटके लिहिली आहेत. 'किरात' या टोपणनावाने त्यांनी लेखन केले आहे.

रघुनाथराव पेशवे यांनी अहिल्याबाई होळकर यांच्या राज्यावर स्वारी करण्याचा बेत केला. त्या वेळी बाईमाणूस असूनदेखील अहिल्याबाई मुळीच डगमगल्या नाहीत. हा कठीण प्रसंग त्यांनी कसा धैर्याने निभावून नेला, हे पुढील नाट्यप्रवेशावरून तुमच्या लक्षात येईल.

## प्रवेश पहिला

(अहिल्याबाई पुराण-श्रवणास बसल्या आहेत. पुराण संपल्यावर त्या राघोबादादांकडून आलेले पत्र वाचत आहेत.)

**अहिल्याबाई :** पुराणिकबुवा! पाहा, हे दादासाहेब पेशव्यांचं पत्र पाहा. मनुष्य एक योजना करत असतो आणि दैव कसं निराळीच योजना करत असतं! दादासाहेब म्हणतात, 'आम्हांला सैन्यासाठी तूर्त पैशाची फार नड आहे. सबब आपला खजिना आमचे हवाली करावा!' मी तर हे धन दानधर्म करण्याकरता म्हणून वेगळं काढून ठेवलं आहे; पण इथं तर हे धर्मयुद्ध त्याच्या आड येत आहे! सर्व हिंदुस्थानभर देवालयं, धर्मशाळा, विहिरी व घाट बांधून तीर्थयात्रा करणाऱ्या धार्मिक लोकांच्याकरता सोयी करून ठेवाव्यात असे माझे मनोरथ, पण हे मनोरथ या एका चिठोऱ्यानं जागच्या जागी ढासळतात की काय अशी मला भीती वाटते! अन् काय करावं ते सुचत नाही.

**पुराणिक :** दानधर्माकरता म्हणून काढून ठेवलेली रक्कम अन्य कामी खर्च करणं केव्हाही श्रेयस्कर होणार नाही. ती आपण निश्चित केल्याप्रमाणं दानधर्माकडेच वेचली गेली पाहिजे! पण श्रीमंत पेशवे आपले धनी; आपण त्यांचे चाकर. तेव्हा

या बाबतीत आपल्यास कोण काय सल्ला देणार? पण मनुष्यानं दृढचित्त आणि निश्चितबुद्धी असावं. त्यानं धर्माची कास सोडू नये. 'यतो धर्मस्ततो जयः' श्रीकृष्णाचं हे वचन आहे.

**अहिल्याबाई :** धर्माची कास सोडू नये ना? ठीक आहे. हाच तुमचा उपदेश मला मान्य आहे. मला तो सर्वस्वी पटला. आता माझी बुद्धी निश्चित झाली आणि मनही दृढ झालं. आता ते ढळणार नाही.

**पुराणिक :** म्हणजे! आपण योजलं आहे तरी काय?

**अहिल्याबाई :** दुसरं काय योजणार? श्रीमंत पेशवे ब्राम्हण आहेत. त्यांना मी आपला दानधर्माकरता म्हणून काढून ठेवलेला सारा खजिना दान म्हणून देऊन टाकते. मग ते त्याचा विनियोग आपल्यास पाहिजे तसा करोत!

**पुराणिक :** वा! फार उत्तम! फार उत्तम योजना! पण–

**अहिल्याबाई :** पण काय?

**पुराणिक :** पण इतकंच की ती योजना त्या दादासाहेबांना मान्य होईल की नाही कोण जाणे!

**अहिल्याबाई :** का नाही मान्य होणार?

**पुराणिक :** कारण एकदा तलवार हाती धरल्यावर याचकवृत्ती स्वीकारणं त्यांना कदाचित अपमानास्पद वाटेल अशी भीती वाटते!

**अहिल्याबाई :** मग याला काय इलाज ते पाहुणे आहेत. मी त्यांना असंच उत्तर लिहून थैली पाठवते. भगवान श्रीकृष्णाचा उपदेश काय आहे म्हणतात? 'यतो धर्मस्ततो जयः' असाच ना? ठीक आहे; हा उपदेश मला शिरसामान्य आहे. आपण यावं आता.

(पुराणिकबुवा जातात.)

## प्रवेश दुसरा

**अहिल्याबाई :** (स्वगत) हे श्रीमंत दादासाहेब माझ्या पत्राला उत्तर न पाठवता माझ्याच जासुदाबरोबर उलट निरोप पाठवतात, की 'दान म्हणून आम्ही एका कपर्दिकेचाही स्वीकार करणार नाही! मुकाट्यानं आपला खजिना आमच्या स्वाधीन करावा. नाहीतर आम्हांला शस्त्र उचलावं लागेल!' वा! खासा न्याय! एकूण धनी आपल्या सेवकावर शस्त्र उचलणार!

(इतक्यात यमुना येते.)

**यमुना :** सेवकावर कोण शस्त्र उचलणार म्हटलेत ?

**अहिल्याबाई :** धनी ! हा या मृत्युलोकातला न्यायच आहे.

**यमुना :** म्हणजे ? याचा अर्थ काय बाईसाहेब ?

**अहिल्याबाई :** याचा अर्थ एवढाच, की आपल्याला आपल्या धन्याशी लढायला आता तयार असलं पाहिजे ! यमुने ! तुला, गंगूला, वाड्यातील झाडून साऱ्या बायांना दादासाहेबांशी युद्ध करायला तयार झालं पाहिजे !

**यमुना :** म्हणजे श्रीमंतांकडून असा निरोप तरी काय आला ?

**अहिल्याबाई :** निरोप असा आला की, 'आम्ही दान घेणार नाही, सगळा खजिना पाठवा, नाहीतर लढाईला सिद्ध व्हा !'

**यमुना :** मग ? आपल्याकडून पुन्हा उत्तर गेलं आहे ना दादासाहेबांना ?

**अहिल्याबाई :** हो. मी हे द्रव्य धर्मदायाकरता काढलेलं आहे. तेव्हा ते इतर गोष्टींकडे खर्च करता येत नाही. इतक्याउपर धन्याची मर्जी ते घेण्याचीच असेल, तर ही अहिल्या धर्मासाठी मरायलासुद्धा तयार आहे. या बाईशी दोन हात करा अन् घ्या हे द्रव्य ! नाही कोण म्हणतो ? असं उत्तर गेलं आहे.

**यमुना :** मग लढाईची काय तयारी ?

**अहिल्याबाई :** काय तयारी करायची ? परमेश्वरच सगळी तयारी करून देईल. 'यतो धर्मस्ततो जयः' हे भगवंताचं वचनच आहे. चल, उद्या सकाळी तुझ्या माझ्याकरता दोन खंदे घोडे तयार करून ठेवायला सांग ! (जातात.)

### प्रवेश तिसरा

(स्थळ–रणांगणात अहिल्याबाई वीरवेष धारण करून घोड्यावर बसल्या आहेत व त्यांच्या पिछाडीस हत्यारबंद स्त्रियांचे जंगी सैन्य उभे आहे.)

**रघुनाथराव :** (आपल्या सरदारास) का ? तुम्ही मागंपुढं का पाहता ? अहिल्याबाईचं सैन्य पाहून कचरलात की काय ?

**सरदार :** श्रीमंतांनी शत्रूच्या सैन्याची नीट पाहणी केली नाहीसं दिसतं. बाईच्या सैन्यात एकही पुरुष नाही. साऱ्या स्त्रिया हत्यारबंद ! स्त्रियांवर शस्त्र उचलणं हा क्षत्रियाचा धर्म नाही. त्यातून ती अतिशय धर्मशील बाई ! प्रत्यक्ष जगदंबेचा अवतार ! आपल्या सैन्यातील एकही सरदार त्यांच्यावर हत्यार उचलण्यास तयार नाही !

**रघुनाथराव :** काय ? माझे सरदार माझाच हुकूम मानत नाहीत ?



सरदार : नाही ! बाईशी लढण्याचं साफ नाकारतात ! माझाही पण श्रीमंतांना असाच सल्ला आहे, की अटकेपर्यंत झेंडे नाचवणाऱ्या दादासाहेबांनी स्त्रियांवर चालून जाणं, ही गोष्ट त्यांच्या कीर्तीला अत्यंत काळिमा लावणारी आहे !

रघुनाथराव : काय, तुम्हीही असे म्हणता ? (विचार करून) रास्त ! अगदी रास्त आहे तुमचं म्हणणं ! पैसा मिळून जाईल, पण कीर्तीला कलंक लागला, तर तो मात्र कशानंही धुऊन निघणार नाही ! ठीक आहे. चला तर, आपण दोघेही बाईकडं जाऊ ! (जाऊ लागतात.)

सरदार : या पाहा त्याच इकडं येत आहेत. (दोघेही जवळ येताच बाई त्यांस नमस्कार करतात.)

रघुनाथराव : बाई, तुमची फौज कुठं आहे ? तुमच्या फौजेत तर सर्व स्त्रियाच दिसतात !

अहिल्याबाई : स्त्रीराज्यात फौज दुसरी कोठून असणार ? आणि तिचं प्रयोजन तरी काय ? धनीच आपल्या सेवकांवर उठल्यावर सेवकांनी काय करायचं ? मला एक धर्माचाच काय तो आश्रय. मला एक मंत्र ठाऊक आहे, की 'यतो धर्मस्ततो जयः।' या मंत्रावर माझा पक्का विश्वास आहे आणि त्याच्याच बळावर मी आपणांस जिंकणार !

**रघुनाथराव :** बाईसाहेब ! तुम्ही फार चतुर आणि मुत्सद्दी आहा. धर्मावरची तुमची ही अढळ श्रद्धा पाहून मी अगदी दिपून गेलो आहे. यापुढं तुमच्या दानधर्माच्या आड येण्याची आमची बिलकूल इच्छा नाही. तुम्हांला वाटेल त्याप्रमाणं तुम्ही दानधर्म करावा ! 'यतो धर्मस्ततो जयः' हे वचन भगवंतांनी खरं करून दाखवलं. माझ्याकडून तुमचा छळ झाला याबद्दल मला क्षमा असावी !

**अहिल्याबाई :** धन्यांनी असे शब्द उच्चारून सेवकाला लाजवू नये !

**रघुनाथराव :** यात तुम्हांला लाजवण्याचा भाग नाही. तुम्हीच आपल्या करारी बाण्यानं आम्हा पुरुषांना लाजवून सोडलं आहे !

**अहिल्याबाई :** मी धर्माला जागले असं धनीसाहेबांना वाटत असेल, तर आज वाड्यात सेवकाकडील मीठभाकर खाऊन सेवकावर कृपादृष्टी करावी, इतकीच माझी विनंती आहे.

**रघुनाथराव :** सुभेदारांचे आणि आमचे घरोब्याचे संबंध आहेत. आमची ना नाही. आपल्या मर्जीप्रमाणं होऊ द्या ! 'यतो धर्मस्ततो जयः'

(सर्व जातात.)

मनोरथ – इच्छा; श्रेयस्कर – हितकारक; दृढचित्त – ज्याचे मन खंबीर आहे असा; यतो धर्मस्ततो जयः – ज्याच्या बाजूस धर्म म्हणजे न्याय आहे, त्याच्या बाजूलाच जय होतो; विनियोग करणे – उपयोग करणे; याचकवृत्ती – भिक्षा किंवा दान घेण्याची वृत्ती; स्वगत – नाटकामध्ये एखादे पात्र स्वतःशीच जे भाषण करते त्याला स्वगत म्हणतात. कपर्दीक – कवडी.

अभ्यास :

१. अहिल्याबाईंनी द्रव्य कशासाठी राखून ठेवले होते ?
२. रघुनाथरावांनी अहिल्याबाईंकडे कोणती मागणी केली ?
३. अहिल्याबाईंनी कोणती योजना सुचवली ? ती रघुनाथरावांस का मान्य झाली नाही ?
४. अहिल्याबाईंच्या सैन्यावर सरदार का चालून गेले नाहीत ?
५. 'मला एक धर्माचाच काय तो आश्रय –' या अहिल्याबाईंच्या म्हणण्याचा अर्थ स्पष्ट करा.
६. रघुनाथरावांनी अहिल्याबाईंची गाठ घेण्याचे का ठरवले ? त्यांचे मन कशामुळे वळले ?
७. रघुनाथरावांनी अहिल्याबाईंची क्षमा का मागितली ?
८. 'तुम्ही फार चतुर व मुत्सद्दी आहा !' असे अहिल्याबाईंना रघुनाथराव म्हणतात. तुम्हांला त्याबद्दल काय वाटते ?





.२४.

# आई

उद्धव ज. शेळके

उद्धव ज. शेळके (जन्म : १९३१.) हे कथाकार व कादंबरीकार आहेत. त्यांची 'धग', 'वानगी', 'शिळान अधिक आठ कथा' ही व इतर अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. पुढील कथा त्यांच्या 'शिळान अधिक आठ कथा' या कथासंग्रहातून घेतली आहे.
या कथेत त्यांनी आईच्या मायेचे चित्र रेखाटले आहे.

आईला शेतात जायचे होते. त्या घाईने ती थंडया पाण्याच्या भाकरी करत होती. पिठाचा उंडा मळताना एकीकडे मला हलकेच म्हणत होती, 'काशा, तुला तर आज सुटीच असेल, नाही रे?"

"हो, का?"

"तर मग आजचा दिवस माझ्याबरोबर चलतो काय?"

आईचा उद्देश मला बोचला. नकळत माझ्या सुरात तो डोकावला– "कुठं ग?"

"मी म्हणत होते की—" आई मुद्दाम माझ्याकडे न बघता तव्यावरची भाकरी कोरताना म्हणाली, "माझ्याबरोबर निंदायला चलशील तर बरं होईल. एखादी पायगीत घेऊ लागशील. तितकाच तेला-मिठाला आधार होईल."

आईचे संपायच्या आतच मी बोललो, "पण मला निंदता येत नाही ना ग!"

"निंदायला काय वेदमंत्र लागतात रे? मी सांगेन तुला कसं निंदायचं ते!"

"माझ्याकडून होईल?"

"जेवढी होईल तेवढीच तू निंद. उरलीच तर मी घेऊ लागेन. झालं आता?" मीही बोललो, "पण मला अभ्यास करायचा आहे ना ग!"

"अस्सं?" आता आईनं एकदम माझ्याकडे डोळे फिरवले. सूर ताणून विचारले, "प्रत्येक सुट्टीच्या दिवशी, तू अभ्यासच करत असतोस, नाही रे?"

"आतापर्यंत नाही केला; पण आजपासून करत जाईन. मास्तर म्हणाले, की

आता परीक्षा जवळ आली. जो अभ्यास करणार नाही, तो नापास होईल–"

माझं संपायच्या आत हातावरची भाकर तव्यावर आपटताना ती म्हणाली, "मला चतुराई शिकवतो काय रे? अजून मी बोळयानं दूध पीत नाही–समजला!"

मी जीव तोडून म्हणालो, "जा. तुला खोटंच वाटतं नेहमी–सगळं!"

माझे न ऐकता ती लगेच एकेरीवर येऊन पुटपुटू लागली, "चल, माझ्याशी एक अक्षर बोलू नको! आता पाहते ना तुझी मजाच! मग समजेल, आजपासून कुठं खाशील ते!"

हे सुरू असताना माझ्या पुढ्यात त्या दिवसाचे भवितव्य नाचू लागले. मी वेळीच सावरते घेतले, "बरं,येईन आजच्या दिवस!"

पण वेळ निघून गेलेली होती. आई एकदम म्हणाली, "काही नको येऊ–बिऊ. माझ्यावर फालतूच उपकार कशाला करतो?"

यावर मीही ताठरलो. माझ्या ओठात राग थरथरू लागला, पण बाहेर डोकावण्याचे धाडस त्याच्यात नव्हते.

आईही बेपर्वा राहिली. घाईघाईनं दीड भाकर, वरणाचा पेंड व अघळपघळ चटणी घेऊन तिने लुगडयाच्या पदरात शिदोरी बांधली. सुभद्रेची भाकर तिच्या सुपूर्त करून ती सरस्वतीकडे ठेवायला सांगितली. उरलेल्या भाकरी दुरडीत एकावर एक रचून ठेवल्या. आईला दुरडीवर झाकण ठेवताना पाहून सुभद्रा माझ्या खुणावण्यानं म्हणाली, "आई, काशाला काही खायचं ठेवलं नाही काय?"



"गप्प बैस ना, नाही तर तुलाही ठेवीन तशीच कडावर!"

यावर सुभद्रा भांबावल्यागत झाली. आळीपाळीने आईकडे अन् माझ्याकडे नुसती पाहात राहिली. आई काही बोलली नाही. एका हाती शिदोरी व दुसऱ्या हातात कुलूप घेऊन बाहेर पडताना ती मला म्हणाली, "हं, चला रावसाहेब, निघा बाहेर."

मीही मुकाट्याने बाहेर पडलो. तिने कुलूप घेतले. सुभद्रेने आपली भाकर घेऊन सरस्वतीच्या घराची वाट धरली. दाराच्या नाकात कुलपाची नथ अडकवून झाल्यावर आईने माझ्याकडे पाहात, निर्वाणीने विचारले, "मग, नाही चलत ना निंदायला?"

यावर का कुणास माहीत, आई नरमली अन् त्या भरवशावर मी ताठरू लागलो. मला बोलायला उशीर झाला आणि तिथेच माझी भयंकर चूक झाली. कारण पुढच्याच क्षणी आई धमकीने म्हणाली, "असं आहे तर मग! नाही?"



आणि ती शेताच्या वाटेने चालू लागली. पाहता पाहता वाऱ्यासारखी दिसेनाशी झाली. माझ्या बुबुळांवर अश्रूंचा तगर तरंगला. भान विसरून मी आईची कोरी वाट न्याहाळत राहिलो. बराच वेळ गेला. हे बघत असलेल्या सुभद्रेचा चेहरा केविलवाणा झाला. ती मला म्हणाली, "काशा, आईनं तुझ्यासाठी जेवायला नाही ठेवलं काय रे?"

मी चिडून म्हणालो, "न ठेवू दे नाही ठेवलं तर!"

जरा वेळाने सुभद्रेला भूक लागली. मी मनातून याचीच वाट पाहात होतो. आपली भाकर खाताना सुभद्रा मला म्हणाली, "काशा, येरे आपण जेऊ!"

"भाकर तर थोडीशीच आहे," मी उगीचच म्हणालो.

"असू दे. अर्धी अर्धी वाटून खाऊ."

"नाही बा."

"का रे?"

"तू आईला सांगशील, पोट्टे!"

"नाही सांगत."

"खरंच?"

"हो," ती समजदारासारखी माझ्या कंठमण्यावर हात ठेवून म्हणाली, "तुझ्या गळ्याची शपथ!"

नंतर मी तिच्या शिदोरीत सामील झालो. वयाप्रमाणे सुभद्रेच्या जेवणापेक्षा माझ्या जेवणाचा वेग जास्त होता. त्याचा फायदा घेऊन मी बकाबका भाकर खाल्ली. सुभद्रेची हळुवार रवंथ संपली. दोघांनीही हात ओलवले.

मी सदऱ्याच्या बाहीने तोंड कोरडवत कोरडवत शाळासोबत्यांच्या घराचा रस्ता धरला. सापडेल त्याच्या घरात शिरून दिवस कलेपर्यंत खेळत बसलो. दिवस कलण्यापूर्वीच माझे लक्ष खेळावरून उडाले. भुकेच्या नावाने पोट कुत्कुत् करत होते. खेळात लक्ष लागत नव्हते. आरोळ्या-जांभया सतत चालू होत्या. मी एकीकडे कलतीकडे झुकणाऱ्या सूर्याच्या गोळ्याकडे बघत होतो व दुसरीकडे केवळ वेळ काढावा म्हणून सोबत्यांशी बोलत होतो. पण अखेर मी खेळ टाकून घराची वाट धरली. घरी आलो, त्या वेळी सुभद्रा उंबऱ्यात डोके ठेवून माझी वाट बघत असलेली दिसली. तिचाही चेहरा उतरलेला अन् डोळ्यांत पाणी तरारत होते. मला पाहताच ती म्हणाली, "काशा, मला भूक लागली रे!"

"मग, मी काय करू?"

"कुलूप उघड. आपण दोघं बहीण-भावंडं जेवू!"

"माझ्याजवळ किल्ली नाही."

"मग माझ्या भाकरीतली भाकर का खाल्ली रे, तू?"

ती एकदम रडकुंडीस आली. नाकातून सूर काढत तालावर बोलल्यासारखी म्हणाली, "ते काही नाही काशा, मला भूक लागली. मला जेऊ दे, नाहीतर मी आईला सांगते. हो—"

असे ती अगदी पहिल्यांदा म्हणाली तेव्हा मी आईच्या धाकाने घाबरूनच गेलो; पण नंतर आता बिनधोकपणे म्हणालो, "जा. सांग–"

यावर भुकेपेक्षा मी केलेल्या अपमानाने ती चिडली. भोकाड पसरले. 'मी आईला सांगते, मी आईला सांगते,' असे टुमणे आळवले अन् मग झोपी गेली.

ती झोपेच्या स्वाधीन होऊन आपले भुकेचे दुःख विसरून गेली. पण माझ्या जाणत्या शरीराला ते जमले नाही. मला ते सतत टोचत राहिले. आईच्या म्हणण्याप्रमाणे मी ऐकले असते तर बरे झाले असते, असे मला वारंवार वाटू लागले.

तेवढ्यातच आई घरी आली. तिला लांबून बघून मी सुभद्रेला जागे केले. ती उठली आणि घराकडे येणाऱ्या आईच्या वाटेवर गेली. पण आई एकदम घरी आली नाही. पहिल्यांदा तिने सरस्वतीच्या ओसरीत बस्तान ठोकले. माझ्याकडे पाहून न पाहिल्यासारखे भासवले. चुकून दृष्टादृष्ट झालीच तर आईचे डोळे मोठे होत; ते पाहून माझी छाती धसकली. तरी मनाचा हिय्या करून मी तिच्या दिशेने गेलो. माझी चाहूल घेऊन तिचा चेहरा खूप कडवट झाला. वेळ प्रसंगी माझ्याकडे पाठही केली गेली. पण बोलली काही नाही अन् म्हणून मी तिथे उभा राहू शकलो.

बसल्या बसल्या सरस्वती आणि आई यांच्यामध्ये शेतजमिनीतल्या गप्पांसोबत पान-खांडाची देवाण-घेवाणही सुरू झाली. आईने कमरेची पिशवी काढली. पण कधी चुना तर कधी तंबाखू खुंटला. आता काथ खुंटल्याचे पाहताच आई सरस्वतीला म्हणाली,

"काथ तर नाही ग आता."

तसा मी धूर्तपणा साधून म्हणालो, "मी आणतो."

"काही नाही आणाबिणाचा." असे बोलून आई अतिशय कठोर स्वरात म्हणाली, "आणता येतो मला."

हे ऐकून आम्हा दोघांत पडलेल्या अंतरात टाका मारण्याचा माझा प्रयत्न फुकट गेल्याचे दुःख मला फार जाणवले. तेवढ्यात माझी बाजू घेऊन म्हणा किंवा सहज म्हणा—सरस्वती आईला म्हणाली, "तो आणतो म्हणतो, तर का आणू देत नाही ग, त्याला?"

यावर आईने अंग हिसडले. नाक मुरडल्यासारखे केले. तेव्हा सरस्वतीने विचारले "का, झालं तरी काय?"

"मला त्या मुदबक्याविषयी तू बोलायला नको लावूस, बिचारे!"

नंतर आई स्वतः आमच्या घरात गेली. काथ आणला. दोघींचे पान खाणे झाले. थोडया वेळात आई घरात आली. आपली कामे करू लागली. ती पाण्याच्या घागरी घेऊन विहिरीवर गेल्याची संधी साधून मी चिमणीत तेल ओतले. आगपेटी घेऊन चिमणी लावायला बसलो. तितक्यात एक डोक्यावर अन् दोन घागरी हातांत घेऊन येत असलेली आई माझ्यावर खेकसली, "ठेव! ठेव ती चिमणी अन् आगपेटी! तुला कुणी सांगितल्या या म्हालपंचायती करायला, अं!"

तरीही आईचे हात रिकामे नसल्याचे पाहून मी माझे काम सुरूच ठेवले. पण आईने लगेच होत्या जागी घागरी पटकल्या अन तरतरा चालत माझ्याजवळ आली.

माझ्या हातातली चिमणी व आगपेटी हिसकताना म्हणाली, "खबरदार, कधी माझ्या कोणत्याच कामाला हात लावशील तर— "

आणि तिने स्वतःच दिवा लावला.

यानंतर मीही आईच्या कोणत्याही कामात मदत करण्याचे सोडून दिले. ती सारे काही एकटीच करत होती. कोणते हलके-सलके व सुभद्रेला जमण्यासारखे काम असले तर तिच्याकडून ते करवून घेत होती. तिला सांगितलेल्या कामात माझी लुडबूड तिला खपत नव्हती. असेच आणखी दोनदा माझ्या वाट्याला आल्यावर आता मीही थोडा अकडलोच. खरोखर काहीएक न करता खोलीतल्या एखाद्या वस्तूसारखा एका कोपऱ्यात बसून मुकाट्याने सारे पाहू-न्याहळू लागलो.

आईची सारी कामे आटोपली म्हणजे आई जेवायला बसत असे. तशी ती आताही बसणार होती. शिंक्यातले सारे काही ताटात वाढून घेतल्यावर सुभद्रेला जवळ बसवले. वरणा-डाळीचा काला केला. त्याचा एक भला-थोरला घास घेतला. त्या वेळी न राहवून तिचे लक्ष माझ्यावर गेलेच. तशी उठून म्हणाली, "चल, ऊठ तिथून. माझ्या खायच्या वेळेस असा ताटापाशी खिळून नको बसू!"

हे ऐकून मला पुरते भडभडून आले; पण इलाज नव्हता. त्यामुळे पाय आपटत अन् नाक फुरफुरवत मी घरातून ओसरीत आलो. ओसरीत अंधार मावत नव्हता. मी बसलो त्या जागेहून मला सुभद्रा व आई पूर्णपणे दिसत होत्या. मी मात्र त्यांना अजिबात दिसत नव्हतो. दिसू नये असाही माझा हेतू होताच.

आईने चारसहा घास घेतले. पाणी प्यायली. तोंडचा पेला काढला. लुगड्याचा पदर डोळ्याला लावला. डोळे कोरडवत पण हलकेच सुभद्रेला म्हणाली, "पोट्टे, जा, तो बेइमान आहे का पाहा बरं ओसरीत."

हे ऐकून सुभद्रा तिथे येण्यापूर्वी मी सटकलो. ओसरीतल्या कुणासही सहजासहजी दिसणार नाही, अशा अगदी दाट अंधारात जाऊन उजेडातल्या आईकडे व सुभद्रेकडे पाहू लागलो. सुभद्रा ओसरीत आली. वरवर पाहिल्यासारखे करून घाईने आईच्या ताटाशी बसताना म्हणाली, "आई, तो तर नाही ग तिथं!"

आईचा चावता घास एकदम थांबला. ती म्हणाली, "काय, काशा ओसरीत नाही?"

"नाही."

"चांगलं पाहयलं?"

"हो ना ग...."

तसा आईचा एक हात चिमणीकडे गेला. ती घेऊन ती उठली. ओसरीत आली. ओसरीचा कोनाकोपरा धुंडाळत असताना तिचे एकदम माझ्यावर लक्ष गेले–तशी सुरात रखरखीतपणाची ओढाताण करीत मला म्हणाली, "येनं–येनं बेइमाना, तुझी टेक झाली पुरी; पण माझी नाही होत पुरी कधी. मला तर तुमचे पाय धरावेच लागतात. चल, बसतो की नाही ताटावर हात पाय धून!"

उंडा – गोळा; पाथ – पिकाची ओळ; पाय घेऊ लागणे– निंदण्यास मदत करणे, परोळे – भाकर शेकायची चुलीपुढील जागा. मजाल – हिंमत; भवितव्य – नशीब, भविष्य; ताठारलो – रागाने फुगलो; सुपूर्त करणे – स्वाधीन करणे; दुरडी – भाकरी ठेवण्यासाठी वापरावयाची एक प्रकारची टोपली. कडावर ठेवणे–उपाशी ठेवणे; निर्वाणीने–निकराने; तगर–तवंग; मुदबक्या–थापाड्या, आयतोबा; म्हालपंचायती – नसत्या पंचायती; टेक – जिद्द

बोळयानं दूध पिणे – फार लहान असणे; जीव तोडून सांगणे – कळकळीने सांगणे; एकेरीवर येणे – भांडणास सिद्ध होणे; बस्तान ठोकणे – बैठक मारणे.

**अभ्यास :**

१. आईच्या बोलण्याचा उद्देश काशाला का बोचला ?

२. शेतात जाताना आईने काशासाठी जेवायला काहीच का ठेवले नाही ?

३. काशा सुभद्रेच्या शिदोरीत का सामील झाला ?

४. शेतातून परत आल्यावर काशाला पाहून आईचा चेहरा का कडवट झाला ?

५. 'तुझी टेक झाली पुरी; पण माझी नाही होत पुरी कधी.'—असे आई काशाला का म्हणाली ?

६. 'मी आणि माझी आई'—यावर दहा-बारा ओळी लिहा.

७. कवी यशवंत यांची 'आई' ही कविता वाचा.



.२५.

# पांढऱ्यावरची लाल फुली

यदुनाथ थत्ते

यदुनाथ थत्ते (जन्म : १९२२.) हे 'साधना' साप्ताहिकाचे संपादक आहेत. त्यांची 'आचार्य विनोबा', 'पुढे व्हा', 'यशाची वाटचाल' इत्यादी अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. त्यांनी मुलांसाठीदेखील अनेक मनोरंजक व माहितीपर पुस्तके लिहिली आहेत.

पुढील पाठात त्यांनी एका महत्त्वाच्या संघटनेची माहिती दिली आहे.

१८६३ चे वर्ष. फेब्रुवारीची १७ तारीख. जेनेव्हा येथे पाच माणसे जमली होती. त्यांनी युद्ध पाहिले होते, अनुभवले होते. त्या पाचांत एक होता हेन्री ड्यूमाँ. उत्तर इटलीत सोलफेरिनो येथे १८५९ साली त्याने रणमैदानावरील जखमींची होणारी दुर्दशा पाहिली होती. त्या वेळी त्याचे वय होते एकतीस वर्षांचे. त्याने जे पाहिले, ते त्याला स्वस्थ बसू देत नव्हते. त्याच्या डोळ्यांपुढे ती दृश्ये सारखी तरळत होती. त्या किंकाळ्या, तो आक्रोश, ते रक्त, ते अश्रू त्याच्या नजरेसमोरून काही केल्या हालत नव्हते. त्या आठवणींनी त्याला जणू झपाटून टाकले होते. तो काही सराईत लेखक नव्हता; पण त्याने सोलफेरिनोच्या रणक्षेत्रातील जखमींच्या त्या किंकाळ्या आणि आक्रोश, ते कण्हणे आणि विव्हळणे आपल्या शब्दांत पकडण्याचा प्रयत्न केला. त्या आठवणींचे पुस्तक त्याने छापून घेतले.

१८६२ साली त्याचे ते पुस्तक प्रसिद्ध झाले. ते पुस्तक वाचून लोक अस्वस्थ होऊ लागले. पृथ्वीच्या पाठीवरून युद्धाची कायमची हकालपट्टी करावी, असे ते पुस्तक वाचणाराला वाटे. पण हे घडावे कसे? करावे कुणी? लोक चडफडत, चुळ-बुळत आणि आपल्याला काही करता येत नाही म्हणून खिन्न होत.

यातून मार्ग काय? हेन्रीने याचा विचार करण्यासाठी आपल्या त्या मित्रांना बोलावले होते. युद्ध थांबवणे आपल्याला शक्य नाही म्हणून का स्वस्थ बसायचे? आणि युद्ध जगातून नाहीसे झाले, तरी रोगराई राहणारच आहे, नैसर्गिक आपत्ती ओढवणारच आहेत. कुठे पूर, कुठे वादळे, कुठे दुष्काळ, कुठे ज्वालामुखी, कुठे आग,

कुठे इमारतींची पडझड होतच राहील; कितीही टाळली तरी ही संकटे येणारच. मग जखमी झालेल्या, आजाराने पछाडलेल्या माणसांना का तसेच सोडायचे? तुम्ही म्हणाल डॉक्टर आहेत, परिचारिका आहेत त्यांच्यासाठी. होय, आहेत. पण एकदम अशा आपत्ती आल्या तर ही माणसे कुठे कुठे धावणार! काय काय करणार!

सामान्य माणसाला त्यांच्यासाठी काहीच का करता येणार नाही? प्राथमिक उपचार करणे अवघड का आहे? अंग चेपून देणे अशक्य का आहे? गोड बोलून रिझवणे का आवाक्याबाहेरचे आहे? मनोरंजन करणे, कुशल समाचार पुसणे, काही आरोग्यवर्धक वस्तू देणे हे नाही का जमणार? पाची जण विचारात गढून गेले होते. युद्धाचा पसारा केवढा! आकाशच फाटले तर ठिगळ कुठे आणि कोण लावणार?

त्या पाचांना वाटले, असे हताश होण्यात काय अर्थ? मदत करता येत नाही म्हणून रडत बसण्यापेक्षा ज्या शेपन्नासांचे दुःख हलके करता येईल, त्यांचे दुःख हलके का करू नये? अशा निश्चयाने ते कार्याला लागले. त्यांनी पाचांचीच एक समिती बनवली. लोकांपुढे आपली तळमळ ते मांडत राहिले. त्यांचा तो उमाळा पाहून लोकांनाही त्यांना साथ दयावीशी वाटू लागली. सात-आठ महिने त्यांनी झटून प्रयत्न केला.

मग त्यांनी २६ ते २९ ऑक्टोबर १८६३ ला एक परिषद बोलावली. तशी ही पाची माणसे सामान्यच; पण त्यांनी जे काम अंगावर घेतले ते माणुसकीचे फार मोठे काम होते. जेनेव्हामधल्या राजवाडयात सोळा युरोपीय राष्ट्रांचे प्रतिनिधी जमले. जखमींची शुश्रूषा करायची, हे वाटते तेवढे सोपे काम नाही. त्यासाठी आवश्यक ते शिक्षण मिळायला हवे. नुसताच उमाळा उपयोगी नाही, नुसतेच तंत्रही उपयोगी नाही. उमाळा असेल त्यांनी योग्य शिक्षण घेतले पाहिजे आणि त्यांना आजाऱ्यांची कणव वाटली पाहिजे. स्वेच्छेने या कामासाठी मंडळींनी पुढे आले पाहिजे. या सोळा युरोपीय देशांतील प्रतिनिधींनी या दृष्टीने हालचालींना सुरुवात केली.

आणि एवढ्यात १८६४ साली डेन्मार्कविरुद्ध युद्ध जुंपले. या समितीची मंडळी युद्धक्षेत्राकडे धावून गेली. प्राण धोक्यात घालून जखमींची शुश्रूषा करू लागली. जात, धर्म, भाषा, देश असा कसलाही आपपरभाव मनात न आणता ते सेवाशुश्रूषा करू लागले. लढणाऱ्यांनाही त्यांच्या शौर्याचे कौतुक वाटले आणि त्यांना लढाईची झळ पोचू नये यासाठी काहीतरी मार्ग काढला पाहिजे, असे त्यांना वाटू लागले. मानवाच्या या अशा सेवकांची चटकन ओळख पटावी म्हणून पांढऱ्या पार्श्वभूमीवर लाल रंगाची फुली असलेले चिन्ह सर्वांनी मान्य केले आणि 'रेडक्रॉस'

म्हणून ही 'मानवसेवकांची सेना' ओळखली जाऊ लागली. मानवता, निःपक्षपातीपणा, तटस्थता, स्वातंत्र्य, स्वेच्छा-सेवा आणि सार्वत्रिकता ही रेडक्रॉसची पायाभूत तत्वे आहेत. जगातले शंभर देश या संघटनेशी





संलग्न आहेत. युद्धात, दंगलीत, नैसर्गिक आपत्तीत ही संस्था साहाय्यार्थ धावून जातेच; पण जिथे दारिद्र्य, उपासमार, रोगराई असेल तिथेही ती जाते.

भारतात १९२० साली रेडक्रॉस संस्थेचे लोण पोचले आणि वाढत वाढत संस्था देशव्यापी बनली. भारताचे राष्ट्रपती हे या संस्थेचे अध्यक्ष आहेत आणि राज्यशाखांच्या अध्यक्षपदी त्या त्या राज्यांचे राज्यपाल आहेत.

ही संघटना मोठ्यांसाठीच आहे असे मात्र नव्हे. तिची एक बालशाखाही असते आणि तिच्यात पंचवीस वर्षांखालील कोणालाही सामील होता येते. सेवेची आवड असणारे लोक उत्साहाने येतात, शिक्षण घेतात आणि आपत्काळी सेवेसाठी धावून जातात. भारतात लाखापेक्षा अधिक तरुण या कार्यात सामील झालेले आहेत.



हेन्री ड्यूनाँ यांनी शंभर वर्षांपूर्वी एक छोटेसे बी पेरले. आज त्याचा विशाल वटवृक्ष झाला आहे. हेन्रीच्या वेळी शुश्रूषेची व मदतीची साधने तुटपुंजी होती. आज विज्ञानाने त्यांत कितीतरी भर घातली आहे! विज्ञानाने मदतीची किती तरी नवी दालने उघडली आहेत. आजाऱ्यांना आता रक्त देता येते, डोळे देता येतात. रक्ताचेही आता अधिकोषण करून ठेवता येते. डोळ्यांचेही अधिकोष असतात.



युद्धे दिवसेंदिवस कमीच होणार, कारण देशादेशांत समजूतदारपणा वाढत आहे. पण पूर, वादळे, भूकंप, दुष्काळ आणि रोगांच्या साथी इत्यादी संकटे कधी येतील ते सांगता येत नाही. अशा संकटांच्या वेळी माणसांना मदतीची गरज असते. दारिद्र्य, उपासमार, अज्ञान, अंधश्रद्धा यांमुळेही माणसांना दुःखे भोगावी लागतात. रेडक्रॉस ही संस्था अशा सर्व प्रसंगी मदत करत असते. साहाय्यासाठी धावून जाते. रेडक्रॉस किंवा पांढऱ्या पार्श्वभूमीवरची लाल फुली ही आता जगभर दलितपीडितांना, आर्तदुःखितांना, आक्रंदन करणाऱ्या, विव्हळणाऱ्या, सर्वांना दिलासा देणारी खूण बनली आहे.

अधिकोष – पेटी;(जसे रक्तपेटी.)

अभ्यास :

१. 'रेडक्रॉस' ही संस्था स्थापण्याची कल्पना कुणाला सुचली? कोणत्या प्रसंगी? ती कल्पना अमलात आणण्यासाठी त्यांनी प्रथम काय काय केले?
२. 'रेडक्रॉस' ही संस्था कोणकोणती कामे करते? भारतात तिचा प्रसार कसा झाला?
३. 'रेडक्रॉस' या संस्थेची युद्ध नसतानाही आवश्यकता का असते?

वाक्यांत उपयोग करा :

झपाटून टाकणे, आजाराने पछाडणे, आकाश फाटणे, आपपरभाव मनात न ठेवणे.

४. 'पांढऱ्यावरची लाल फुली' ही खूण काय दाखवते? ती आज कुठे कुठे वापरली जाते?



.२६.

# अक्का

काकासाहेब कालेलकर

**आचार्य द. बा. ऊर्फ काकासाहेब कालेलकर (जन्म : १८८५.) यांची 'स्मरणयात्रा', 'लोकमाता' व इतरही अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. त्यांचा 'अक्का' हा पाठ 'स्मरणयात्रा' या पुस्तकातून घेतला आहे.**

या पाठात कालेलकरांनी आपल्या बहिणीविषयीच्या सांगितलेल्या आठवणी अंतःकरणास चटका लावतात.

सातार्‍याची गोष्ट. एके दिवशी एक गाडी आमच्या दारी येऊन उभी राहिली आणि तिच्यातून एक ठिपक्याठिपक्यांचे सुंदर पातळ नेसलेली बाई खाली उतरली. तिच्याजवळ सामानही पुष्कळ होते. मी आईला हाक मारून म्हटले, "घरात कोणसं आलं आहे!" माझी अपेक्षा अशी होती, की आई आतून बाहेर येईपर्यंत ही बाई दरवाजातच वाट पाहील; पण ती सरळ आत गेली आणि घरचीच असल्याप्रमाणे घरात इकडे तिकडे फिरू लागली. मला नंतर कळले, की ती माझी बहीणच आहे! पुष्कळ दिवस सासरी राहून माहेरी आली आहे.

जेवण आटोपल्यावर तिने आपले सर्व सामान सोडून आईला दाखवले. त्यांतून पाचसहा सुंदर सुंदर रंगीत काचेच्या गोट्या निघाल्या. त्या मला देऊन ती म्हणाली, "दत्तू, घे तुला बैदुल!" मला आनंद तर झालाच, पण आनंदापेक्षा आश्चर्य अधिक वाटले. घरी बाबा आम्हांला बैदुलांना शिवू देत नसत. गोट्यांचा खेळ जुगारी लोकच खेळतात, चांगल्या घरची मुले गोट्या खेळत नसतात, असे आमच्या मनावर ठसवले होते. त्यामुळे वाटोळ्या गोट्या पाहून जरी तोंडाला पाणी सुटले, तरी त्यांना शिवण्याची आम्हांला हिंमत होत नसे.

बैदुल मिळाल्याचा आनंद तर झालाच, पण त्यांनी खेळायचे कसे, हे ठाऊक असेल तर ना? बैदुल घेऊन मी गोंदूकडे धाव ठोकली. त्यालादेखील बैदुलांचा खेळ ठाऊक नव्हता. तेव्हा आम्ही भिंतीशी समोरासमोर बसून एकमेकांकडे जमिनीवरून गोट्या

फेकायला सुरुवात केली. एकमेकांच्या बैदुलांची टक्कर झाली म्हणजे आम्हांला खूप गंमत वाटे. पण सारा वेळ मनात धाकधूक असायची, की जर बाबांची दृष्टी पडली तर खेळ बंद व्हायचा; इतकेच नव्हे, तर बैदुलही जप्त व्हायचे !

अक्का घरात सर्वांची आवडती आहे, हे मला कळायला फारसा वेळ लागला नाही. अक्काच्या शहाणपणावर आणि प्रेमळ स्वभावावर आई तर कुरवंडून जाई. वडील सारा दिवस भागूला काय हवे, तिला काय आवडते, हे समजून घेण्यास उत्सुक असत. माझ्या मनाची खात्री झाली, की अक्का करील ते चांगले; अक्काचे वर्तन ते चांगले वर्तन. अक्काच्या तोंडून गोष्टी ऐकणे मला फार आवडे.

अक्काने घरी येताच मला शिकवायला सुरुवात केली. मी बिगारीच्या वर्गात होतो. मी वाचताना अडखळलो तरीदेखील अक्का माझ्यावर रागावत नसे; तर अत्यंत प्रेमाने आणि मोठया चातुर्याने मला शिकवत असे. तिला शिकवण्याची हातोटी चांगली होती. रोज संध्याकाळी 'रामविजय' घेऊन ती आईला वाचून दाखवत असे. मी नियमाने ऐकायला बसत असे.

एके दिवशी अक्का आईला म्हणाली, "आई, आपण हा पोपट घरात बाळगला आहे; त्याला सोडून देऊ या."

आश्चर्यचकित होऊन मी विचारले, "पण का? पोपट तर आम्हां सर्वांना आवडतो. त्याला का काढून लावायचं?"

अक्काने लागलीच सुस्वर कंठाने नळदमयंती-आख्यान सुरू केले. त्यात राजाच्या हाती सापडलेला हंस सुटून जाण्याची धडपड करतो. स्वतःला सोडून देण्यासाठी राजाला परोपरीने विनवतो. तरीही राजा सोडत नाही असे पाहून तो निराश होतो. स्वतःची म्हातारी आई, स्वतःची मादी आणि पिल्ले यांची आठवण करून विलाप करतो. हा प्रसंग आला तेव्हा अक्काच्याने राहवेना. तिला रडू कोसळले. थोडया वेळाने आसू पुसून त्या ओळींचा अर्थ तिने स्फुंदत स्फुंदत आम्हांला सांगितला. सर्वांच्या हृदयाला पाझर फुटला आणि तावडतोब निश्चय झाला, की पोपटाला कोंडून ठेवता कामा नये. विष्णूने पोपटाचा पिंजरा नेऊन सीताफळाच्या झाडावर टांगला आणि हळूच पिंजऱ्याचे दार उघडले. एक क्षण तर पोपटाला उडून जायचे सुचलेही नाही. हे झाले कसे म्हणून बिचारा दबकून गेला असेल, चकित झाला असेल. दुसऱ्याच क्षणी पिंजऱ्यातील दांडीवरून उडून तो पिंजऱ्याच्या उघडया दारात बसला आणि तेथून भर्रकन आकाशात उडून गेला. अक्काच्या डोळ्यांत आनंदाचे

मोती चमकू लागले. केसूने टाळ्या पिटल्या. सर्वच जण माना वर करून पोपट कुठे जातो हे पाहू लागले. थोड्याच वेळात पोपट परत आला आणि पिंजऱ्यावर बसला. विष्णू म्हणाला, "अरे, हा काही आपल्याला सोडून जायचा नाही. आपण याला हळूच पकडून पुन्हा पिंजऱ्यात कोंडून घालू." पण अक्काने तसे करायचे नाही म्हणून निक्षून सांगितले. पुढे रोज तो पोपट सीताफळाच्या झाडावर येऊन बसत असे. आम्ही केळे किंवा मिरच्या आणून दिल्या तर आमच्या हातून घेऊन खात असे आणि उडून जात असे. असे एखादा महिना चालले असेल. पुढे पुढे तो पोपट इतर पोपटांत मिसळून गेला आणि मग आमच्याजवळ येण्याचे त्याने बंद केले.

अक्काच्या तोंडून ऐकलेले नळाख्यान पुढे मीही तोंडपाठ केले. अजूनही आठवते ते. हंस राजाला प्रार्थून म्हणतो—

जागजागी आहेत वीर कोटी
भले झुंझारहि शक्ति जयां मोठी
तयां माराया धैर्य धरी पोटी,
पाखरू हे मारणे बुद्धि खोटी
वधुनि माझी हे कनकरूप काया
कटकमुकुटादिक भूषणे कराया
कशी आशा उपजली तुला राया
काय नाही तूजला दयामाया !



तरीही नळराजा हंसाला सोडीना! तेव्हा हंस त्याच्या मनात करुणा उत्पन्न करण्यासाठी आपल्या घराकडील हकीकत सांगतो :

> म्हातारी उडता नयेचि तिजला माता मदीया अशी,
> कांता काय वदो नवप्रसव ते साता दिसांची तशी,
> पाता त्या उभयांस मी मज विधी घातास योजीतसे
> हातामाजि नृपा तुझ्या गवसलो आता करावे कसे?

आम्ही शाहपूरला आलो. सराफगल्लीतील भिशांचे घर, ते आमचे आजोळ. तिथे आम्ही राहिलो; अक्का आजारी होती. मोठी मामी रोज सकाळी उठून पेज तयार करी व आम्हा मुलांची पंगत बसवून आम्हांला जेवू घाली. तोंडी लावण्यासाठी पुष्कळदा भाजीच्याऐवजी आम्हांला भोपळ्याचे सांडगेच तळून दिले जात. साताऱ्याला असताना नेहमी तांदळाचे सांडगे खाण्याची मला सवय होती. मला हे भोपळ्याचे सांडगे कसे आवडावेत? मी माझी नावड व्यक्त करण्यासाठी मामीला म्हणालो, "आमच्या घरचे (तांदळाचे) सांडगे 'काव काव' करतात आणि तुमच्या घरचे हे सांडगे 'चिव चिव' करतात; म्हणून हे सांडगे मला आवडत नाहीत." माझ्या या काव्याचे त्या वेळी बरेच कौतुक झाले.

थोड्याच दिवसांत घरात सर्वत्र उदासीनतेची आणि चिंतेची छाया पसरली. अक्काचे दुखणे विकोपास गेले. एके दिवशी सकाळी उठताच समोरच्या घरच्या लोकांनी आम्हांला आपल्या घरी जेवायला बोलवले. आम्ही सर्व मंडळी तेथे गेलो. कोण जाणे कशासाठी, पण आम्हांला तेथेच अडकवून ठेवण्याचे निरनिराळे प्रयोग होऊ लागले. मी घरी जाण्याची गोष्ट काढली, की लागलीच एखादा मोठा मुलगा मला म्हणायचा, "चल, तुला एक गोष्ट सांगतो." गोष्ट कशीबशी पुरी झाली म्हणजे तो गाऊन दाखवी. असे करता करता संध्याकाळ होत आली. आता मला वाटू लागले, की सगळा दिवस आम्हांला येथे बसवून ठेवण्यात काहीतरी हेतू आहे. मी कंटाळून भोकाड पसरले. मी रडतो आहे एवढ्याचसाठी गोंदूला सहानुभूतीचे रडे कोसळले. ज्यांच्या घरी आम्ही गेलो होतो त्यांच्या मुलांना आता काय करावे ते समजेना. बिचारे मेटाकुटीस आले. इतक्यात शेजारच्या दुसऱ्या एका मुलाने येऊन मला म्हटले, "भिशांच्या घरी तुझा बाप मोठ्याने रडत आहे." त्याचे हे वाक्य ऐकून मला त्याचा फारच राग आला. माझ्या वडलांसंबंधाने एकेरी शब्द वापरतो!



आणि माझे वडील कधी रडतील का? जन्मात मी कधी तसे पाहिले नव्हते. मी चिडून त्याला म्हणालो, "तू खोटं बोलतोस." आणि मी तडक घरी आलो. रात्रीचे नऊ वाजण्याचा सुमार असेल. घरी सर्वत्र दुःखाची छटा पसरली होती. कोणी कोणाशी बोलत नव्हते. पुढल्या खोलीत एका कोपऱ्यात तांदळाचे अर्धे भरलेले पोते ठेवले होते. त्यावर माझे वडील एक पातळ उपरणे पांघरून बसले होते. थंडीने ते काकडत असावेत असे वाटत होते. मला मांडीवर घेऊन दुःखी आवाजाने ते म्हणाले, "दत्तू, आपली भागू आपल्याला सोडून दूर गेली!"

मला काही केल्या समजेना, की झाले आहे काय? दूर म्हणजे कुठवर गेली असेल? कशासाठी गेली असेल? वडील इतके दुःखी का? घरात कुणीच कुणाशी का बोलत नाही? वडील तर राहून राहून एकच वाक्य बोलत-"आपली भागू आपल्याला सोडून दूर गेली!"....

रात्र कशीबशी निघून गेली. दुसऱ्या दिवशी आई काहीच खाईना. सगळयांनी परोपरीने सांगून पाहिले, पण तिने कोणाचेच ऐकले नाही. शेवटचा उपाय म्हणून राममामा मला आईजवळ घेऊन गेले. त्यांनी मला सांगितले, "तुझ्या आईला म्हण – तू जर जेवली नाहीस, तर तुला माझ्या गळयाची शपथ आहे."

मी तसे म्हणणार इतक्यात आईने मला दटावून म्हटले, "दत्तू, तसं काही बोलू नकोस." झाले. मातृभक्त दत्तूची जीभ आता कसची हालते?

अक्काविषयीची माझी प्रत्यक्ष संस्मरणे काय ती एवढीच; पण लहानपणापासून मी त्या संस्मरणांचे ध्यान करत करत त्यांचे संगोपन करत आलो आहे.

मनुष्याच्या जवळ जवळ सर्वच शुभ वृत्तींचा विकास कौटुंबिक वातावरणात होत असतो. त्यातही आईच्यानंतर जर कुणाची मुलावर विशेष छाप पडत असेल तर ती वडील बहिणीचीच.

मला समजू लागले त्यापूर्वीच माझी एकुलती एक बहीण वारली. त्यामुळे माझ्या जीवनातील हे एक दालन प्रथमपासूनच शून्यवत झाले आहे. माझी भगिनीप्रेमाची भूक राहूनच गेली आहे. मी जेव्हा मोठा झालो तेव्हा मला वाटे, मला एखादी बहीण असती तर किती चांगले झाले असते!

आख्यान–कथा, चरित्र; विधी–ब्रम्हदेव; संस्मरणे–आठवणी; परिपक्व–पिकलेले, परिपूर्ण झालेले.

अभ्यास :

१. बैदुलांबद्दल दत्तूचा कोणता समज होता?
२. अक्काच्या स्वभावाचे वर्णन करणारी या पाठातील वाक्ये शोधा. त्यांतून अक्काच्या स्वभावाबद्दल काय काय कळते?
३. पिंजऱ्यातल्या पोपटाने रानात गेल्यावर तेथल्या पोपटांना काय काय सांगितले असेल?
४. 'मी त्या संस्मरणांचे ध्यान करत करत त्यांचे संगोपन करत आलो आहे'—या वाक्याचा अर्थ स्पष्ट करा.





.२७.

# इर्जिक

गो. नी. दांडेकर

गो. नी. दांडेकर (जन्म : १९१६.) यांनी कथा, कादंबरी, नाटक, इत्यादी विविध प्रकारचे लेखन केले आहे. त्यांची 'पडघवली', 'माचीवरला बुधा', 'जगन्नाथाचा रथ', 'आईची देणगी' (आठ भाग) इत्यादी अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. पुढील संगीतिका त्यांच्या 'पाच संगीतिका' या संग्रहातून घेतली आहे.

शेतकरी आपली शेतीची काही कामे सहकाराने करतात. अशा वेळी कामाचा मोबदला पैशाच्या रूपाने दिला जात नाही; पण प्रेमभावाने सर्वांना भोजन दिले जाते. या प्रथेला इर्जिक असे म्हणतात. काही भागात त्याला 'आयार करणे', काही भागात 'पाव्हणेर करणे' असेही म्हणतात.

१

**सामूहिक :** आखाडाचा मास म्होरं न्हायला र उभा
काळी काळी झाली बगा, गगनाची सोभा





नांगुरवाले औतकरी
शेतकरी कामकरी
गावकरी शीवकरी

गाती दिमाखानं इर्जिकीचं गाणं
र इर्जिकचं गाणं

**एक शेतकरी :** कोंबडयाची साद मला ऐकू आली
आभाळाची सोभा लाल लाल झाली
चला रे चला भले गडी चला
चला रे चला अवघे गडी चला

**सामूहिक :** चाल् रे गड्या शेतकऱ्या चाल् रे गड्या कामकऱ्या
झालं गड्या झुंजूमुंजू चौघडा र लागे वाजू
गाईगुजी घेऊन निघा
चाल् रे गड्या शेतकऱ्या चाल् रे गड्या कामकऱ्या.
आखाडाचं आलं वारं आली जोसात थोरं पोरं
अवघे मिळू लेझीम खेळू

चाल् रे गड्या शेतकऱ्या चाल् रे गड्या कामकऱ्या
पालवली रानं-वनं कोरड्या रुखा फुटली पानं
आई पांढरी हाक मारी
चाल् रे गड्या शेतकऱ्या चाल् रे गड्या कामकऱ्या
शेतामंदी कष्ट करू आपून गडी शेतं पेरू
गोफण घेऊन रानं राखू
चाल् रे गड्या शेतकऱ्या चाल् रे गड्या कामकऱ्या.

* * * *

**गोजाबाई :** बाई पंढरीचा राजा राजा उभा विटेवरी
माज्या बाळाच्या पाळन्या सोभे रेसमाची दोरी
बाई पंढरीच्या वाटे वाटे संत झाले गोळा
माज्या बाळाच्या ग पाई घाला सोनियाचा वाळा
बाई पंढरीच्या रानी रानी फुलल्या तुळशी
शेजी बंधुराजा माजा गेला की ग दूरदेशी
बाई पंढरीचा वारा वारा वाहे झुळू झुळू
शेजी बाळराजा माझा लागला ग धावू-पळू.

**म्हादा :** कारबारनी आन माजं न्हयारीचं पान
भाकरीला पटनी मजेदार चटनी
संगं हिरवा कांदा अन् मिरचीचा चेंदा
धयाचं लोटकं ताकाचं मडकं
कारबारनी आन माजं न्हयारीचं पान.

**गोजाबाई :** अवं अवं कारभारी कसं सांगू तुम्हां तरी !

**म्हादा :** काय झालं ? काय झालं ?

**गोजाबाई :** घरी न्हाई मीठ बेसनाचं पीठ
भाजी ना पाला काय करू बोला
लेकरू रडतंय् तापानं पडतंय्
मरगळल्यावानी त्याला औशाद ना पानी

**म्हादा :** बरं बरं बरंऽ पुरं झालं पुरंऽ
विटले माजे कान वाइच तमाखु आन

| | | |
|---|---|---|
| गोजाबाई : | कोपऱ्यात बघा | रिकामा डबा |
| | हाय तियं उभा | आवं तुमी धनी, |
| | ऐकाल का माजं ? | |
| म्हादा : | काय काय काय ? | |
| गोजाबाई : | गावचा झाला पेरा | |
| म्हादा : | त्याला पटकीचा फेरा ! | |
| गोजाबाई : | असं का हो बोलता ? | असं का हो चालता ! |
| | गावाला समद्या | शिव्या का हो घालता ! |
| म्हादा : | मग काय करू ? | थुकी झेलीत फिरू ? |
| गोजाबाई : | काही कलं उमजंना | भळी पडल्या समद्या राना |
| | कशी व्हावी नांगरनी | कशी व्हावी कोळपनी ? |

* * * *

(दाजी पाटलाच्या घरासमोर वारकरी गात आहे.)

वारकरी : खेळ मांडियेला । वाळवंटी घाई । नाचति वैष्णव भाई रे ॥ ध्रु० ॥
वर्ण अभिमान । विसरली याती । एकएका लोटांगणी जाती रे
निर्मळ चित्ते । झाली नवनीते । पाषाण पाझर फुटती रे
होतो जयजयकार । गर्जत अंबर । पातले वैष्णव वीर रे
तुका म्हणे सोपी । केली पायवाट । तरावया भवसागर रे

| | | |
|---|---|---|
| दाजी पाटील : | भले, भले, भले | वारकरी दादा |
| | आज हाय् एकादशी, जेवायला या उद्या | |

(गोजाबाई येते.)

| | | |
|---|---|---|
| गोजाबाई : | अवं, काका दाजी ! | |
| दाजी : | कोन हाय् ? गोजी ? | |
| गोजाबाई : | व्हय दाजी, लेक तुमची | आपल्या घरी आली |
| | वादळानं भ्याली हरणी | आली झाडाखाली |
| दाजी : | ये माज्या लेकी | हायेस ना सुखी ? |

| | | |
|---|---|---|
| **गोजाबाई :** | ज्याच्या गळा अडकला | नशिबाचा फासा |
| | सुखी कसा व्हावा काका | आगीतला मासा ? |
| **दाजी :** | का ग बाई का ? | |
| **गोजी :** | हिरदयातलं दुख दाजी | तुम्हां कसं सांगू |
| | इकडं आड तिकडं विहीर | सांगा कशी वागू ? |
| **दाजी :** | सांग पोरी आपल्या | दाजीला सांग ! |
| **गोजी :** | कसं सांगू ? घरधनी– | |
| **दाजी :** | सांग पोरी सांग— | |
| **गोजी :** | आता उद्या पडल पानी | धरती पिकल सोन्यावानी |
| | पर— | |
| **दाजी :** | पर काय पोरी ? | |
| **गोजी :** | दाजीकाका, आमच्या रानी | नाही झाली नांगरनी |
| | | नाही झाली कोळपनी |
| **दाजी :** | हात्तिच्या, एवढंच ना ! | उद्या तुझ्या रानी |
| | इंजिक घालूनशानी | आम्ही करू नांगरनी |
| | | आम्ही करू कोळपनी |
| **गोजी :** | दाजीकाका– | |
| **दाजी :** | व्हय पोरी ! व्हय— | |

* * * *

| | | |
|---|---|---|
| **दाजी :** | विठ्या, म्हाद्या | या रे या रे ! |
| | पघा पघा | जमले सारे ! |
| **विठ्या :** | व्हय् दाजी | व्हय् दाजी |
| **दाजी :** | भले गडी भले गडी | नीट सेज धरा |
| | एकामागून एक औत | हाका भरा भरा |
| **सामूहिक :** | चाल रे चंद्या | चाल रे नांद्या |
| | परजन राजा | यायचा उंद्या |
| | चाल रे चंद्या | चाल रे नांद्या |



सूर्व्या देवाची तापली उन्हं
भाजून्श्यानी निघाली रानं
शेजीनं आता औतं चालू द्या
तासामागून चालू द्या तास
दान्यांची उद्या पिकल रास
धरतीवरी घाम गळू द्या
झाले रे काळे डोंगर दरे
आटून गेले रानाचें झरे
कौल देवाचा कामी लागू द्या

दाजी : भले रे गडी भले रे गडी
आपुल्या रे भावासाठी
घातली उडी भले रे गडी

सामूहिक : एक आमुचा देश गडे हो एक आमुचा वेऽष
आजवरी भावाभावाची झाली होती ताडातोडी!
भले रे गडी
एक आमुचं खाणं–पिणं एक आमुचं घेणं–देणं
एका जिवानं एका भावानं नांदल् अमुची म्होरली पिढी
भले रे गडी
एका जुटीनं शेतं पेरू एका मुठीनं सारा भरू
दिसाया जरी न्याऽरं न्यारं. एक आमुची हाय् रं कुडी
भले रे गडी

अभ्यास :

१. कोणाच्या शेतीतले काम मागे पडले होते? कोणते काम?
२. गोजाबाई आपले काम करून घेण्यासाठी कोणाकडे गेली? त्याचे मन वळवण्यासाठी तिने काय सांगितले?
३. तिच्या शेतातील काम पुरे कसे झाले? गायिलेल्या त्या सामूहिक गीतांचा भावार्थ लिहा.
४. पुढील शब्दांचे अर्थ लिहा : मरगळणे, मळी, वैष्णव, नवनीत, अंबर, भवसागर.
५. अर्थ स्पष्ट करा :
'धरती पिकल सोन्यावानी',
'इकडं आड तिकडं विहीर', 'सुखी कसा व्हावा काका, आगीतला मासा?'
६. या धड्यातील ग्रामीण भाषेतील दहा शब्द सांगा. ते कोणत्या शब्दांबद्दल आले आहेत?
७. 'इर्जिक' या संगीतिकेतील प्रसंग गोष्टीरूपाने थोडक्यात लिहा.





.२८.

# गांधीदर्शन

१

## स्वच्छतेचा आग्रह

—लल्लुभाई मकनजी

बिर्ला कुटुंबाशी गांधीजींचा फारच निकटचा संबंध होता. दिल्लीत असताना ते नेहमी बिर्लाभवनमध्येच राहात असत. बिर्लांसारख्या श्रीमंतांच्या घरी गांधीजींनी राहणे हे काही लोकांना पसंत नव्हते. बिर्ला गांधीजींचा गैरफायदा घेतात असे त्या लोकांचे म्हणणे होते. अशा लोकांना गांधीजी विनोदाने म्हणत असत—"मी पक्का बनिया आहे. मला बिर्लाजी धोका देऊ शकतील असं मला वाटत नाही!"

एकदा गांधीजी बिर्लाभवनमध्ये राहात असता ते सकाळी स्नानासाठी जात होते. पण स्नानघरात बिर्लाजी स्वतः स्नान करत होते. बिर्लाजी स्नान करून बाहेर आल्यावर गांधीजी स्नानघरात गेले. आत जाऊन पाहतात तो बिर्लाजींचे ओले धोतर तेथे पडले होते. ते बाजूला करून स्नान करण्याऐवजी गांधीजींनी ते धुऊन टाकले व मग ते स्नानास बसले. बिर्लाजींचा नोकर धोतर नेण्यासाठी आला; पण त्याच्या आधीच स्नानघराचा दरवाजा बंद झाला होता. गांधीजींनी आपले धोतरही हाताने धुऊन टाकले. हे दोन्ही कपडे घेऊन ते बाहेर आले व ते दोरीवर वाळत टाकत होते. इतक्यात घाईघाईने बिर्लाजी तिथे येऊन पोहोचले.

"बापूजी, बापूजी हे काय करता आहात तुम्ही!" असे म्हणून ते गांधीजींच्या हातातले धोतर काढून घेऊ लागले. या घटनेमुळे त्यांना फार वाईट वाटले.

धोतर पसरता पसरता गांधीजी म्हणाले, "धोतर मी धुतलं यात काय बिघडलं? धोतर स्नानघरात पडलं होतं, त्याच्यावर कोणाचे पाय पडले असते, त्याऐवजी मी ते धुऊन स्वच्छ केलं, हे चांगलं नाही का झालं?"

"बापू...." एवढेच बिर्लाजी काकुळतीने म्हणाले. गांधीजींसारख्या महापुरुषाने आपले धोतर धुतले हे मनात येऊन त्यांना फार दुःख झाले व स्नानघर ताबडतोब

स्वच्छ न करवण्याच्या निष्काळजीपणाबद्दल त्यांना पश्चात्ताप होऊ लागला. त्यांना काय बोलावे काही सुचेना. ते बोलले, "बापू, तुमच्यावर कामाचा इतका मोठा बोजा असताना तुम्ही माझं धोतर का धुतलंत?"

गांधीजी म्हणाले, "जीवनात स्वच्छता व सफाई या कामाशिवाय मोठं काम आणखी कोणतं आहे?"

बिर्लाजी बिचारे काय बोलणार! त्यांना माहीत होते, की गांधीजी स्वच्छतेविषयी दृढ आग्रह धरत असतात; परंतु स्वच्छतेबाबतच्या इतक्या कडक मात्रेचा अनुभव त्यांना या प्रसंगाने चांगलाच आला!

२

## अर्धं भांडं पाणी

—वि. स. खांडेकर

काल संध्याकाळी दहा-बारा वर्षांचा एक मुलगा माझी स्वाक्षरी घेण्याकरता आला. त्याच्या सुंदर स्वाक्षरी-पुस्तिकेत मी सही केली. त्याने लगेच संदेश द्या म्हणून हट्ट धरला. मी त्याला म्हणालो, "तू गांधीजींचं एक चागलं वाक्य मला सांग. संदेश



हा वादळी समुद्रातल्या दीपस्तंभासारखा हवा. गांधीजींसारख्या महापुरुषांची वचनंच संदेश म्हणून शोभतात. तेव्हा तू तुला आवडणारं गांधीजींचं एक वाक्य मला सांग." हे ऐकून स्वारी गडबडली. त्याची पाठ थोपटत मी म्हटले, "असा रडवेला होऊ नकोस; पण गांधीजींचं एकतरी चांगलं वाक्य तुला ठाऊक असायला नको का? जरा बैस इथं. मी तुला गांधीजींची एक गोष्ट सांगतो. त्या गोष्टीतून कोणता संदेश मिळतो ते पाहा."

गोष्ट म्हटल्यावर त्याचा चेहरा फुलला. तो उत्सुकतेने ऐकू लागला. मी सांगू लागलो–"फार फार जुनी गोष्ट आहे. गांधी जितके साधे होते तितकीच साधी गोष्ट आहे गांधींच्या आश्रमातली. एके दिवशी गांधीजी काही लिहीत बसले होते. त्यांना लागली तहान. त्यांनी कुणालातरी हाक मारली. 'प्यायला पाणी आण', असं सांगितलं. त्या माणसानं फुलपात्र भरून पाणी आणलं. गांधीजी त्यातलं निम्मं पाणी प्याले, निम्मं पाणी त्यांनी तसंच ठेवलं. ते पुन्हा लिहू लागले. त्या माणसाला वाटलं, गांधीजींना हवं होतं तेवढं पाणी ते प्याले. आता भांडं विसळायला काही हरकत नाही. त्यानं ते भांडं उचललं. पाणी खिडकीतून बाहेर फेकून दिलं. गांधीजींचं लक्ष त्याच्याकडं गेलं. ते एकदम म्हणाले, 'अरे, हे काय केलंस?' तो चपापला. आपली काय चूक झाली हे त्याला कळेना. तो नम्रपणानं म्हणाला, 'तुमचं पाणी पिऊन झालं असं मला वाटलं म्हणून हे उरलेलं पाणी मी फेकून दिलं.' गांधीजी हसत उत्तरले, 'अरे,उरलेलं पाणी मला प्यायला नको होतं. पण तू ते फुकट का घालवलंस? माझ्या डोक्यावरल्या कपड्याच्या घडीवर ते घालता आलं नसतं का?'....'

मी थांबलो. त्या मुलाला म्हटलं, "सांग आता तुझा संदेश."

त्यानं दोन-तीनदा पुटपुटल्यासारखं काही केले. या साध्यासुध्या प्रसंगाचे तात्पर्य त्याला कळले होते, हे त्याच्या चेहऱ्यावरून उघड दिसत होते. पण ते सुंदर शब्दांनी कसे सांगावे हे त्याला कळत नव्हते. मी खनपटीला बसणार असे वाटताच, "मी उद्या संदेश तयार करून आणतो. तो तुम्ही मला लिहून द्याल ना?" असे म्हणत त्याने माझा निरोप घेतला.

मी मानेने 'हो' म्हटले. मुलगा निघून गेला. त्या भांड्यातल्या एवढ्याशा पाण्याची उधळपट्टी गांधीजींना सहन झाली नाही आणि त्यांचा वारसा सांगणारे आम्ही? शब्द, वेळ, शक्ती, पैसा, साऱ्या साऱ्या गोष्टींची वारेमाप उधळपट्टी करत आहोत.

माझ्या मनात आले—महापुरुष साध्या शब्दांतून, साध्या प्रसंगांतून किती किती गोष्टी जगाला शिकवत असतात. त्या भांड्यातल्या शिल्लक राहिलेल्या पाण्याचा संदेश आपल्याला कळला तर किती छान होईल!

३

## सत्याचा वारसा

—श्रीपाद जोशी

गांधीजी आफ्रिकेत वकिली करत होते; परंतु त्यांनी कधी खोटा खटला चालवला नाही. त्यांची सत्यनिष्ठा सर्वांना ठाऊक झाली होती. त्यामुळे त्यांच्याकडे कोणी खटला आणतच नसे.

एकदा एक पारशी व्यापारी रुस्तुमजी शेठ यांच्यावर एक मोठे संकट आले. रुस्तुमजी शेठ व जकात अधिकारी यांचे संबंध चांगले होते. शेठजी मुंबई, कलकत्ता येथून माल मागवत; परंतु काही जादा माल ते जकात चुकवून आणत. एकदा अधिकाऱ्यांना शंका आली आणि खरी गोष्ट उघडकीस आली. सरकारने त्यांच्यावर खटला भरण्याचे ठरवले.

रुस्तुमजी शेठ गांधीजींकडे आले. त्यांच्या डोळ्यांतून अश्रू येत होते. त्यांच्या प्रतिष्ठेलाच धक्का लागण्याची वेळ आली होती.

"तुम्ही आपला गुन्हा प्रांजळपणे कबूल करा." गांधीजींनी सल्ला दिला.

"तुमच्याजवळ केला ना कबूल!" ते म्हणाले.

"तुम्ही सरकारला फसवलं आहे. माझ्याजवळ कबूल करून काय उपयोग? सरकारजवळ कबूल केलं पाहिजे." गांधीजींनी सांगितले.

रुस्तुमजी शेठजींचे वकील निराळा सल्ला देत होते. परंतु शेठजींनी गांधीजींच्या सल्ल्याप्रमाणे वागण्याचे ठरवले. गांधीजी जकात-अधिकाऱ्यांना व सरकारी वकिलांना भेटले. 'तुम्ही ठरवाल तो दंड शेठजी देतील' असे गांधीजींनी त्यांना सांगितले. अधिकाऱ्यांना अधिक संशयाला जागा नव्हती. सारे सत्य आपल्यासमोर उघड झाले आहे अशी त्यांची खात्री झाली. जेवढी जकात चुकवली होती त्याच्या दुप्पट दंड शेठजींनी भरावा असे ठरले. तडजोडीने प्रश्न मिटला. ती सर्व हकीगत नीट लिहून काढून शेठजींनी आपल्या बैठकीच्या जागी लावून ठेवली. तो सत्याचा वारसा त्यांनी आपल्या वारसदारांसाठी राखून ठेवला.



.२९.

# विचारधन

## १
## कष्टाचा पहिला रुपया

**—धोंडो केशव कर्वे**

मुंबईला आल्यावर साधल्यास एखादी शिकवणी करून पैशाची थोडी मदत मिळवावी, असे मनात होतेच. तशी संधी आपोआप मिळाली. मी पाचव्या इयत्तेत असताना वर्गातील एका मुलाने 'तू माझ्या भावाला शिकवशील काय?' म्हणून विचारले. मी होय म्हटले व काहीएक ठराव न करता त्याच्या घरी जाऊन दररोज एक तास त्याच्या भावास शिकवण्यास सुरुवात केली. हा निदान दोन रुपये दरमहा तरी देईल, असे मला वाटत होते. परंतु महिना झाल्यानंतर एक रुपया त्याने माझ्या हातावर ठेवला, तेव्हा माझा थोडासा विरस झाला; तथापि मुंबईस आल्यानंतर स्वतःच्या कष्टाने मिळवलेला हा पहिला रुपया होता, म्हणून मला आनंद झाला. तरी ती शिकवणी मी दुसऱ्या दिवसापासूनच सोडली. आमचे परिचित श्री. परशुरामपंत दामले हे शिक्षक असल्यामुळे त्यांच्याकडे शिकवण्या येत व मधून मधून दरमहा दोन अगर तीन रुपयांची शिकवणी ते मला देत. तेव्हा एक लहानशी शिकवणी मला लागली. ती मॅट्रिक्युलेशन पास होईपर्यंत टिकली. एक गृहस्थ दर रविवारी मजबरोबर एक तास 'नवनीता' तला काही भाग वाचत व त्याबद्दल मला दर खेपेस दोन आणे देत असत. अशा रीतीने महिन्याचे आठ आणेच मिळत. तरी त्याबद्दल मला कितीतरी आनंद होई!





२

## वक्तृत्वकला

—वि. दा. सावरकर

माझ्या वयाच्या चौदाव्या वर्षाच्या आधीच मला वक्तृत्वकला येण्यास काय काय साधने उपयोगी पडली, ते थोडक्यात सांगतो. बारा-तेरा वर्षांचा असतानाच वक्तृत्वकला या विषयावरची दोन मराठी पुस्तके मी वाचली. ही कला संपादन करण्यासाठी त्या पुस्तकात सांगितल्याप्रमाणे प्रथम पद्धतशीर निबंध लिहिण्यास शिकणे हेच उत्तम; पण निबंधलेखन हा वक्तृत्वाचा दुय्यम भाग. वक्तृत्वाचा आत्मा म्हणजे भावना.

मी लहानपणापासूनच अनेक कविता, सुभाषिते पाठ केली. बखरी, निबंधमाला इत्यादी ग्रंथांतील उत्तम उतारे मी लिहून काढी आणि ते माझ्या निबंधांत योग्य ठिकाणी घालण्याची सवय करी. सुंदर अवतरणे गुंफून देण्याची मला आवड असे. आपले वक्तृत्व परिणामकारी करावयाचे असेल, तर भावना, भाषाशैली इत्यादी गुणांबरोबरच त्या विषयासंबंधाचाच नव्हे तर पुष्कळशा अवांतर ज्ञानाचाही भरपूर साठा जवळ असला पाहिजे.

सारांश, माझे वक्तृत्व यशस्वी होण्याचे कारण लहानपणापासूनचे माझे विविध व अश्रांत वाचन, मनन आणि निरीक्षण हे आहे.

२

# प्रेम करा

—स. ज. भागवत

'प्रेम करा, प्रेम करा' म्हणून एकसारखा जगात उपदेश चाललेला असतो. प्रेम केल्याने आपला आनंद वाढतो, आपण सुखी होतो, हेही खोटे नाही. पण प्रेम करायचे म्हणजे वाटते तितके सोपे नाही. आपल्याला जो आवडतो, त्याच्यावरच आपण प्रेम करतो. जो आवडत नाही त्याच्यावर प्रेम करता येत नाही. आपली आवडनावड बहुतेक वेळा आपल्याच स्वार्थावर अवलंबून असते. आपले ऐकेल तो आपला आवडता; आपले ऐकणार नाही तो आपला नावडता; असा आहे साधारणपणे माणसाचा स्वभाव. म्हणून 'प्रेम करा' असे सांगितल्याने प्रेम करणे साधत नाही. आपल्या स्वार्थाच्या दृष्टीनेच दुसऱ्याकडे पाहण्याची ही सवय कमी झाली पाहिजे. त्याला एक उपाय आहे. स्वार्थाऐवजी गुणांवर दृष्टी ठेवण्याचे मनाला वळण लावावे. आपल्या संगतीत जो कोणी येईल, त्याचे गुण पाहावयास शिकावे. प्रत्येक व्यक्तीत काहीतरी गुण असतातच. जो गुण दिसेल, त्याचे कौतुक करावे म्हणजे आपले प्रेम वाढत जाते. दुसऱ्याबद्दलचा आदरभाव वाढवल्याशिवाय आपल्या मनात प्रेमभाव उत्पन्न होण्यासारखा नाही. प्रेमभावनेसाठी आदरभावना निर्माण झाली पाहिजे. गुणांच्या चिंतनाशिवाय आदरभावना निर्माण होणार नाही.



४

# राष्ट्रधर्म

—ना. ह. आपटे

तुम्ही कोणत्याही धर्माचे व पंथाचे असा, मी तुम्हांला आपले मानतो आणि क्षेमालिंगन देऊन विनवतो की या बंधूंनो! आपण सारे एक होऊ या आणि राष्ट्रधर्म पाळू या! साऱ्या धर्मांची मूलतत्त्वे एकच नाहीत का?—मग आपसांत विद्रोह का बरे?

हिंदभूमी आपली सर्वांचीच जननी नाही का? प्रत्येक हिंदी माणसाने, ज्या भूमीत त्याचा जन्म झाला, ज्या ठिकाणी त्याचे पूर्वज नांदले व वंशज नांदणार आहेत त्या भूमीच्या उद्धारापुढे बाकीच्या सर्व गोष्टी तुच्छ समजावयास नको काय? हिंदुस्थानात जन्म घेतलेल्या व येथेच राहू पाहणाऱ्या इंग्रजांनीसुद्धा भलत्या मोहाला बळी न पडता या देशाला आपला मायदेश मानून चालायला नको काय?

हिंदुस्थानचे सुख तेच आपले व कुटुंबाचे किंवा जातीचे सुख, त्याचे जे संकट तेच आपणा सर्वांचे संकट, त्याचा अपमान तोच आपला सर्वांचा अपमान अशी आत्मीयता प्रत्येक हिंदवासीयाच्या रोमारोमांत भिनली पाहिजे.

प्रेम, सेवा, त्याग! जगातील कोणताही धर्म घ्या. त्याची मुख्य शिकवण या तीन शब्दांत सामावणारी आहे. राष्ट्रधर्माचे सूत्र हेच असले पाहिजे व हाच त्याचा महामंत्र आहे.



# १. आनंदी-आनंद गडे !

**बालकवी**

त्र्यंबक बापूजी ठोमरे (जन्म : १८९०, मृत्यू : १९१८.) यांची 'श्रावणमासी हर्ष मानसी' ही कविता तुम्ही यापूर्वी वाचली आहे. त्या कवितेत बालकवींनी निसर्गाचे कसे सुंदर वर्णन केले आहे, याचा प्रत्यय तुम्हांला आलाच असेल. बालकवी हे निसर्गाचे कवी. मुलाफुलांचे कवी. 'बालकवींची कविता' या नावाने त्यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. त्यातूनच 'आनंदी-आनंद गडे !' ही कविता घेतली आहे.

सृष्टीत सर्वत्र भरलेल्या आनंदाचे वर्णन या कवितेत कवीने केले आहे.

आनंदी-आनंद गडे, इकडे, तिकडे, चोहिकडे
वरती-खाली, मोद भरे, वायूसंगे मोद भरे
नभात भरला,
दिशांत फिरला,
जगात उरला,
मोद विहरतो चोहिकडे, आनंदी-आनंद गडे !

सूर्यकिरण सोनेरी हे, कौमुदि ही हसते आहे;
खुलली संध्या प्रेमाने, आनंदे गाते गाणे;
मेघ रंगले,
चित्त दंगले,
गान स्फुरले,
इकडे, तिकडे, चोहिकडे आनंदी-आनंद गडे !

वाहति निर्झर मंदगती डोलति लतिका वृक्षतती,
पक्षि मनोहर कूजित रे, कोणाला गातात बरे ?
कमल विकसले,
भ्रमर गुंगले,

डोलत वदले—

इकडे, तिकडे, चोहिकडे, आनंदी–आनंद गडे !

स्वार्थाच्या बाजारात किती पामरे रडतात

त्यांना मोद कसा मिळतो? सोडुनि स्वार्था तो जातो–

द्वेष संपला,

मत्सर गेला,

आता उरला,

इकडे, तिकडे, चोहिकडे, आनंदी–आनंद गडे !



मोद – आनंद; कौमुदी – चांदणे; वृक्षतती – झाडांची रांग; पामर – दीन व्यक्ती.

अभ्यास :

१. कोणाकोणास आनंद झाला आहे? त्यांना झालेला आनंद कशाकशांत दिसून येतो?

२. स्वार्थाच्या बाजारात किती पामरे रडतात;
त्यांना मोद कसा मिळतो? सोडुनि स्वार्था तो जातो—या ओळींचा अर्थ स्पष्ट करा.

३. कविता गुणगुणताना किंवा गाताना विशेष आनंद का वाटतो?



## २. या झोपडीत माझ्या

### संत तुकडोजी महाराज

संत तुकडोजी महाराज (जन्म : १९०९, मृत्यू : १९६८.) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज हे शीघ्र कवी होते. आपल्या खंजिरीवरील भजनांनी त्यांनी जनतेची मने जिंकून घेतली होती. भजन करत असतानाच ते प्रसंगाला अनुरूप अशी काव्यरचना करत. त्यांचा 'ग्रामगीता' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

लहानशा झोपडीत शांतिसुखाचा अनुभव सदैव कसा मिळतो, याचे वर्णन त्यांनी खालील कवितेत केले आहे.

राजास जी महाली, सौख्ये कधी मिळाली<br>
ती सर्व प्राप्त झाली, या झोपडीत माझ्या

भूमीवरी पडावे, ताऱ्यांकडे पहावे<br>
प्रभुनाम नित्य गावे, या झोपडीत माझ्या

पहारे आणि तिजोऱ्या, त्यांतूनि होती चोऱ्या
दारास नाही दोऱ्या, या झोपडीत माझ्या

जाता तया महाला, 'मज्जाव' शब्द आला
भीती न यावयाला, या झोपडीत माझ्या

महाली मऊ बिछाने, कंदील शामदाने
आम्हां जमीन माने, या झोपडीत माझ्या

येता तरी सुखे या, जाता तरी सुखे जा
कोणावरी न बोजा, या झोपडीत माझ्या

पाहूनि सौख्य माते, देवेन्द्र तोहि लाजे
शांती सदा विराजे, या झोपडीत माझ्या.





**अभ्यास :**

१. झोपडीतील कोणकोणती सुखे कवितेत वर्णिली आहेत ?
२. झोपडी व महाल यांतील कोणते फरक कवितेत सांगितले आहेत ?
३. झोपडीतील कोणते सुख पाहून देवेंद्रालाही लाज वाटते ? का ?
४. राजाची सुखे झोपडीतही आहेत असे कवी का म्हणतो ?
५. झोपडीचे आत्मवृत्त दहा-बारा ओळींत लिहा.

## ३. आला क्षण–गेला क्षण !

### केशवसुत

कृ. के. दामले (जन्म : १८६६, मृत्यू : १९०५.) हे 'केशवसुत' या नावाने कविता लिहीत. यांची 'एक खेडे' ही कविता तुम्ही यापूर्वी वाचली आहे. मराठी कवितेला यांनी नवे वळण दिले. केशवसुतांच्या काव्याने मराठी कवितेत एक नवे युग सुरू झाले; म्हणून त्यांना 'युगप्रवर्तक कवी' असे म्हणतात. 'केशवसुतांची कविता' या नावाने त्यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. त्यातूनच 'आला क्षण–गेला क्षण !' ही कविता घेतली आहे.

खालील कवितेत कवीने घड्याळासंबंधी काय सांगितले आहे, पाहा.

गडबड घाई जगात चाले,
आळस डुलक्या देतो, पण
गंभीरपणे घड्याळ बोले—
'आला क्षण-गेला क्षण !'

घड्याळास या नाही घाई,
विसावाहि तो नाही पण,
त्याचे म्हणणे ध्यानी घेई—
'आला क्षण–गेला क्षण !'

कर्तव्या जे तत्पर त्यांचे
दृढ नियमित व्हावयास मन,
घड्याळ बोले अपुल्या वाचे—
'आला क्षण–गेला क्षण !'

कर्तव्याला विमुख आळशी
त्यांच्या हृदयी हाणित घण,
काळ, ऐक ! गातो अपुल्याशी—
'आला क्षण–गेला क्षण !'

लवाजम्याचे हत्ती झुलती
लक्ष त्यांकडे देतो कोण!
मित रव जर हे सावध करिती—
'आला क्षण—गेला क्षण!

विमुख—पाठमोरा; रव—नाद, आवाज.

अभ्यास :

१. उद्योगी माणसाला घड्याळ कोणता इशारा देते? का?
२. आळशांच्या हृदयावर कोण हाणते? का?
३. कवितेच्या शेवटच्या चरणातील कल्पना स्पष्ट करा.
४. सर्वसामान्य माणसांना घड्याळाचा संदेश कोणता?
५. घड्याळ बोलू लागले अशी कल्पना करून या कवितेतील विचार गद्यात लिहा.





## ४. शतकानंतर

**वसंत बापट**

**वसंत बापट** (जन्म : १९२२.) हे मुंबई येथे मराठीचे प्राध्यापक आहेत. 'बिजली', 'सेतू' आणि 'अकरावी दिशा' हे यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. पुढील कविता त्यांच्या 'बिजली' या कवितासंग्रहातून घेतली आहे.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर मनात उचंबळून आलेल्या भावनांचे त्यांनी 'शतकानंतर' या कवितेत वर्णन केले आहे.

शतकानंतर आज पाहिली पहिली रम्य पहाट

मेघ वितळले, गगन निवळले
क्षितिजावर नव रंग उसळले

प्रतिबिंबित ते होउनि खुलले भारतभूमिललाट

आजवरीच्या अंधारात
अनंत झाले उल्कापात
एकवटोनी तेज तयांचे तिमिर सरे घनदाट

फकिरांनी शत यज्ञ मांडले
वेदीवरती रक्त सांडले
त्या रक्ताची क्षितिजावर ये आरुण मंगल लाट

दीप पेटवुनि घरदारांचे
पूजन केले स्वातंत्र्याचे
त्या ज्योतींचे तेज मिसळुनी झाले आज विराट!



अभ्यास :

१. शतकानंतर पाहिलेली पहिली रम्य पहाट कोणती?
२. त्या पहाटेमुळे भारतभूमीत कोणता बदल झाला?
३. त्या पहाटेपूर्वी कोणते उल्कापात झाले?
४. ही पहाट आणण्यासाठी कोणी कोणी काय काय केले?
५. या कवितेत खाली दिलेले शब्द कशासाठी अथवा कोणासाठी कवीने वापरले आहेत?
मेघ, गगन, क्षितिज, अंधार, उल्का, फकीर, यज्ञ, ज्योत.

## ५. थांब जरासा बाळ !

**गोविंदाग्रज**

रा. ग. गडकरी (जन्म : १८८५, मृत्यू : १९१९.) हे नाटककार व कवी होते. 'गोविंदाग्रज' या नावाने ते कविता लिहीत. 'वाग्वैजयंती' हा त्यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. त्यांची 'एकच प्याला', 'भावबंधन' ही व इतर नाटके प्रसिद्ध आहेत. 'थांब जरासा बाळ!' ही कविता त्यांच्या 'वाग्वैजयंती' या कवितासंग्रहातून घेतली आहे.

'थांब जरासा बाळ !' या कवितेत तुम्हांला त्यांच्या कल्पनाविलासाचा प्रत्यय येईल.

थांब जरासा बाळ !

सुंदर खाशा प्रभातकाळी,
चहूकडे ही फुले उमलली,
बाग हासते बाटे सगळी !
शीतल वारा, या जलधारा कारंजाच्या छान !
थांब जरासा बाळ !

रम्य तडागी निर्मळ पाणी,
गाति पाखरे गोजिरवाणी,
आनंदाची बसली ठाणी,
खरे असे रे! तरी नको रे मारू लाडक्या धाव !
थांब जरासा बाळ !

तऱ्हेतऱ्हेची फुले विकसली
रंगीबेरंगी ही सगळी,
तूही शिरता त्यांच्या मेळी,
माझे मग ते फूल कोणते! कसे ओळखू सांग ?
थांब जरासा बाळ !

फुलपाखरे ही स्वच्छंदी,
तूही त्यांच्यासम आनंदी,

क्षणात पडशिल त्यांच्या फंदी
त्यांच्यासंगे, त्यांच्या रंगे, जाशिल उडुनी दूर!
थांब जरासा बाळ!

अशा तुला मग बागडताना,
भरभर वाऱ्यावर फिरताना,
फुलांत दडता की उडताना,
कवण उपायी, आणू ठायी, पुन्हा? लाडक्या सांग!
थांब जरासा बाळ!



अभ्यास :

१. बागेतील कोणकोणती दृश्ये या कवितेत वर्णन केली आहेत?
२. 'थांब जरासा बाळ' असे आई का म्हणते? तिला कोणता प्रश्न पडतो?
३. सृष्टीबद्दल आईला काय वाटत होते?
४. बाळाची कोणाकोणाशी तुलना केली आहे?
५. प्रभात, वारा, फुले, पाखरे, किरण यांचे वर्णन करणारे शब्द शोधा.
६. प्रत्येकी दहा-बारा ओळींचा एकेक स्वतंत्र परिच्छेद लिहा. कवितेत आलेल्या शब्दांचा उपयोग करा :
(अ) मी पाहिलेली बाग, (आ) आमचा बाळ.



# ६. अम्ही तर जंगलची पाखरे

**पां. श्रा. गोरे**

पां. श्रा. गोरे (जन्म : १९०५.) 'वाणीचा हुरडा', 'बोरकूट' हे यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. त्यांच्या कवितेत ग्रामीण जीवनाचे प्रतिबिंब उमटलेले आढळते. पुढील कविता त्यांच्या 'वाणीचा हुरडा' या संग्रहातून घेतली आहे.

'अम्ही तर जंगलची पाखरे' या कवितेत त्यांनी खेड्यातील जीवनात टिपलेल्या आनंदाच्या क्षणाचे दर्शन घडवले आहे.

शेत-माउली अमुच्यासाठी, अम्ही तिची लेकरे
अम्हांला कमी कोणते बरे !
उजाडता दिन खावा भाजुन रोज तुरीचा हुळा
जरा का जठराग्नी कावला
वाणीच्या कसदार नारळी-हुरड्याची ती चवी
पाचही पक्वान्ना लाजवी
माघातिल चवदार हरभरा ऐन रकाण्यावरी
थोडकी काय मजा दे तरी
खुडुनि मुगाच्या शेंगा कधि कोवळ्या
जाता येता खाव्या पाट्यातल्या
गुळचट शेंगा चवळीच्या वा जरठ पोपटी भल्या
लागती भाजुनि किति चांगल्या
तोडावी कधि बोरे काटे काठीने दाबुनी
हिंडता काष्ठी रानीवनी

मध चाखावा गोड मोहळा वरच्यावर झाडुनी
फिरकता दाट चिलाटीतुनी
किति सेवावी त्या जंगलच्या मेव्याची माधुरी
फळे तशि खावी ती कितितरी
पसरुनि पानांवरी शिदोऱ्या सोडाव्या तरुतली
करावी दुपारची न्याहरी
बाजरीची ती गोड शिळी भाकरी
लसूण कांदा चटणी मग तीवरी
मारित मिटक्या यथेच्छ खाता सुधा तुच्छ बापुडी
सुरांची पडेल नक्ल न उडी!
स्फटिकासम हा निर्मळ झुळझुळ जवळ वाहता झरा
ओंजळी भरून प्यावे जला
गुरे पोहणी द्यावी, काळेशार डोह पाहुनी
डुंबावे तुडुंब जलि मागुनी
गर्द सावली आंब्याखाली काय मजा लोळता
वायुची झुळुक गार लागता
फुंकुनि पावा नाद भरावा गोड वनी सुस्वरी
चढोनी राती माळ्यावरी
धनवंता घरि काय कुणा या सम
लाभतील ही गोड सुखे निरुपम!
महाल–माडी अम्हां झोपडी, रान सदा मोकळे
अम्ही तर जंगलची पाखरे.



अभ्यास :

१. 'शेत हीच आपली माउली' असे कवी का म्हणतो?
२. ही माउली कवीला जंगलचा कोणता मेवा खायला देते?
३. शेतकऱ्याला त्याचे जेवण अमृतापेक्षाही अधिक का आवडते?
४. 'अम्ही तर जंगलची पाखरे' असे कवी कोणास उद्देशून म्हणतो?
५. 'शेतकरी जीवन' या विषयावर दहा-बारा ओळी लिहा.

# ७. संताजीची घोडदौड

## दु. आ. तिवारी

दु. आ. तिवारी (जन्म : १८८७, मृत्यू : १९३९.) यांची कविता शाहिरी थाटाची आहे. ऐतिहासिक प्रसंगाचे स्फूर्तिदायक वर्णन हा यांच्या कवितेचा विशेष होय. 'मराठयांची संग्राम गीते' 'झाशीची राणी' हे त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. पुढील कविता 'मराठयांची संग्रामगीते' या संग्रहातून घेतली आहे.

संभाजी महाराजांच्या वधानंतर येसूबाई व बाल शाहू मोगलांच्या हातात सापडले. रायगडाची गादी जिंजीला गेली! मोगल सेना ज्या त्या किल्ल्यावर हिरवे निशाण फडकवू लागली! ती वेळ मोठ्या आणीबाणीची होती. धनाजी जाधव व संताजी घोरपडे या रणधुंजारांनी आणि प्रल्हाद निराजीसारख्या राजकारणी पुरुषांनी त्या वेळी मराठी राज्याची इमारत कृतनिश्चयाने सावरली. संताजी घोरपड्यांनी तर आपल्या घोडदळाच्या साह्याने औरंगजेबाला अगदी जेरीस आणून सोडले होते.

तळहाती शिर घेउनिया दख्खनची सेना लढली
तरि विजयी मोंगलसेना नच नामोहरम जहाली
पडली मिठि रायगडाला सोडविता नाही सुटली
राजरत्न राजाराम
कंठास त्यास लावून
जिंजीवरती ठेवून
परते सरसेनापतिची घोडदौड संताजीची

गिरसप्पा वाहे धो धो प्रतिसारिल त्याला कोण?
शिशिराचा वारा सों सों रोधील तयाला कोण?
हिमशैल–खंड कोसळता प्रतिरोधिल त्याला कोण?
होता जो गंगथडीला
आला तो भीमथडीला
एकाच दिसात उडाला
करि दैना परसेनेची घोडदौड संताजीची

पुरताच बांधिला चंग घोड्यास चढविला तंग
सोडी न हयाचे अंग भाला बरचीचा संग
औरंगाचा नवरंग उतरला जाहला दंग

तुरगावर जेवण जेवी
तुरगावर निद्रा घेई
अंग ना धरेला लावी

भूमीस खूण टापांची घोडदौड संताजीची



संचरले होते न कळे    तुरगांसहि कैसे स्फुरण
उफळाया बघती वेगे    रिकिबीत ठेविता चरण
जणु त्यांसहि ठावे होते    युद्धी 'जय किंवा मरण'

शत्रूचे पडता वेढे
पाण्याने भरता ओढे
अडती न उधळती घोडे

चालली अशी शर्थीची    घोडदौड संताजीची

नावाचा होता 'संत'    जातीचा होता शूर !
शीलाचा होता साधू    संग्रामी होता धीर !
हृदयाचा सज्जन होता    रणकंदनि होता क्रूर

दुर्गति ती संभाजीची
दैना राजारामाची
अंतरी सर्वदा जाची

उसळे रणशार्दूलाची    घोडदौड संताजीची

मर्दानी लढवय्यांनी    केलेल्या मर्दुमकीची
मर्दानी गीते गाता    मर्दानी चालीवरची
कडकडे डफावरि थाप    मर्दानी शाहीराची

देशाच्या आपत्काली
शर्थीची युद्धे झाली
गा शाहीरा ! या काली

ऐकू दे विजयश्रीची    घोडदौड संताजीची !

**अभ्यास :**

१. संताजीची घोडदौड का सुरू झाली ?
२. संताजीच्या घोडदौडीची कुणाकुणांशी तुलना केली आहे ?
३. संताजी घोडदौड अविश्रांत कशी करीत असे ते स्पष्ट करा.
४. संताजीच्या घोड्यालाही कशा प्रकारचे स्फुरण चढलेले असे ?
५. लढताना संताजीचे कोणते गुण दिसत ?





# ८. आता उजाडेल !

**मंगेश पाडगावकर**

**मंगेश पाडगावकर** (जन्म : १९२९.) हे आकाशवाणी मुंबई केंद्रावर मराठी विभागाचे निर्मितिप्रमुख आहेत. 'धारानृत्य', 'जिप्सी!' इत्यादी त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. 'गाणे अमुचे झुळे' ही त्यांची कविता तुम्ही पूर्वी वाचलीच आहे. 'आता उजाडेल!' ही त्यांची कविता त्यांच्या 'जिप्सी' या कवितासंग्रहातून घेतली आहे.

या कवितेत त्यांनी प्रभातकाळचे कसे वर्णन केले आहे, पाहा.

आता उजाडेल !

खिन्न आंधळा अंधार
आता ओसरेल पार
लहरीत किरणांचा कलावतू मोहरेल
आता उजाडेल !

शुभ्र आनंदाच्या लाटा
गात फुटतील आता
मृदु गळ्यांत खगांच्या किलबिल पालवेल
आता उजाडेल !

वारा हसेल पर्णात
मुग्ध हिरवेपणात
गहिवरल्या प्रकाशी दहिवर मिसळेल
आता उजाडेल !

आनंदात पारिजात
उधळील बरसात
गोड कोवळा गारवा सुगंधात थरारेल
आता उजाडेल!

फुलतील नकळत
कळ्यांतले देवदूत
निळा-सोनेरी गौरव दिशांतून उमलेल
आता उजाडेल!

निळे आकाश भरून
दाही दिशा उजळून
प्रकाशाचे महादान कणाकणांत स्फुरेल
आता उजाडेल!

आज सारे भय सरे
उरी ज्योतिर्मय झरे
पहाटेचा आशीर्वाद प्राणांतून उगवेल
आता उजाडेल!

अभ्यास :

१. उजाडण्याची वाट कवी का पाहतो?
२. उजाडल्यावर सृष्टीत कोणती दृश्ये दिसू लागतील?
३. खाली दिलेल्या ओळीतील कल्पना स्पष्ट करा :
   (अ) गहिवरल्या प्रकाशी दहिवर मिसळेल
   (आ) फुलतील नकळत
        कळ्यांतले देवदूत
   (इ) प्रकाशाचे महादान कणाकणांत स्फुरेल
   (ई) पहाटेचा आशीर्वाद प्राणांतून उगवेल
४. कोमलता हा या कवितेचा एक विशेष आहे. कवितेतील ही कोमलता कवीने कोणकोणत्या शब्दप्रयोगांतून व्यक्त केली आहे?
५. उजाडल्यावर कोणते 'ज्योतिर्मय झरे' निर्माण होतील?

## ९. शिशिर ऋतूचं गान

**वा. रा. कांत**

वा. रा. कांत (जन्म : १९२३.) यांचे 'रुद्रवीणा', 'वेलांटी' हे व इतरही कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. 'शिशिर ऋतूचं गान' ही त्यांची कविता 'वेलांटी' या संग्रहातून घेतली आहे

या कवितेत कवी कांत यांनी शिशिर ऋतूतील निसर्गाचे व पानझडीचे कसे वर्णन केले आहे, पाहा!

हलके हलके हसते गळते तरुचे पान न् पान
बाई, तरुचे पान न् पान
पानझडित या ऐकुन घ्या ग शिशिर ऋतूचं गान
बाई, शिशिर ऋतूचं गान!

हिवात राने पिवळी पडली
उषा धुक्यामधि ही काकडली
ओठच उलले संध्यालाली
नक्षत्रांची रात शहारे गारव्यात हैराण
पानझडित या ऐकुन घ्या ग शिशिर ऋतूचं गान
बाई, शिशिर ऋतूचं गान!

थंडगार किति पवन झोंबतो
उन्हाच्याहि उरि काटा उठतो
पानफुलांचा बहर झडपतो
गळेल वाटे चांदण्यात हे निळे नभाचे पान
पानझडित या ऐकुन घ्या ग शिशिर ऋतूचं गान
बाई, शिशिर ऋतूचं गान!

फुले जळाली, पाने गळली
फळांत जरि रसधार गोठली
सर्व सृष्टि जरि हिमे करपली
पिवळ्या पानांच्या मनि फुलते वसंतस्वप्न महान
पानझडित या ऐकुन घ्या ग शिशिर ऋतूचं गान
बाई, शिशिर ऋतूचं गान!



अभ्यास :

१. हिवाळयात सृष्टीमध्ये कोणकोणते बदल घडलेले दिसून येतात?

२. पुढील कल्पना समजावून घ्या.
   (अ) 'उषा......संध्यालाली'
   (आ) 'फळांत......महान्'

३. या कवितेतील कोणती कल्पना तुम्हांला विशेष आवडली? का?

४. पावसाळयातील सृष्टीचे वर्णन तुमच्या शब्दांत दहा-बारा ओळींत लिहा.





## १०. उघड उघड पाकळी !

ना. घ. देशपांडे

ना. घ. देशपांडे (जन्म : १९०९.) नादमाधुर्य हा यांच्या कवितेचा विशेष आहे. यांचे 'शीळ' व इतर काही कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. 'उघड उघड पाकळी!' ही कविता त्यांच्या 'शीळ' या संग्रहातून घेतली आहे.

आपण मित्राशी बोलावे तसे कवी येथे फुलाशी बोलतो आहे. फुलाला उद्देशून तो काय सांगतो आहे, पाहा.

उघड उघड पाकळी, फुला रे,
उघड उघड पाकळी !



4

आतल्या आत कोवळे
मधुजीवन का कोंडले
बाहेर हवा मोकळी, फुला रे,
उघड उघड पाकळी !

तमसंकुल सरली निशा
नीलारुण हसली उषा
चौफेर विभा फाकली, फुला रे,
उघड उघड पाकळी !

मलयानिल उदयातला
बघ, झोंबत फिरतो तुला
का मृदुल तनू झाकली, फुला रे,
उघड उघड पाकळी !

की रहस्य हृदयातले
आतल्या आत ठेवले
ही तुझी कल्पना खुळी, फुला रे,
उघड उघड पाकळी !

तमसंकुल – अंधाराने दाटलेली; विभा – तेज; मलयानिल – दक्षिणेकडील मलय पर्वतावरून येणारा वारा. मलय पर्वतावर चंदन असल्याने या वायुलहरी सुगंधित असतात. मृदुल – कोमल.

अभ्यास :

१. कवी फुलाला कोणती विनंती करत आहे ? कशाकरता ?
२. रात्र कशी होती ? ती संपली आहे, हे कवीने कोणत्या शब्दांनी वर्णिले आहे ?
३. फुलाच्या अंगाशी कोण झोंबत आहे ? कशासाठी ?
४. फुलाची कोणती कल्पना खुळी आहे असे कवी म्हणतो ?





# ११. कोकिळ

**मो. ग. लोंढे**

मो. ग. लोंढे (जन्म : १८५४, मृत्यू : १९२०.) यांचे 'बोधशतक', 'बोधसुधा' हे काव्यसंग्रह प्रसिद्ध आहेत.

वसंत ऋतूत कोकिळाची 'कुहू कुहू' अशी साद तुम्ही ऐकता कोकिळाची साद ऐकून कवीची मनःस्थिती कशी होते, पाहा.

बहुत मधुर ऐशा काढिशी तू रवाला ।
परिसुनि बहु लागे नाद माझ्या मनाला ॥
टकमक बघतो मी कोठ काही दिसेना ।
मधुर कुठुन येई शब्द हेही कळेना ॥

तरुवरि दिससी ना पर्वतीही न पाही ।
अवनितल रिकामा, कल्पना होत नाही ॥
झुडुप हलत नाही थोर आश्चर्य आहे ।
खग न मजसि वाटे शब्द हा धावताहे ॥

जवळ रव निघावा तोच तो लांब जावा ।
परिसुनि मग का हा जीव ना गोंधळावा ॥
अवनितलि निघे हा, की दरीतून येई ।
समजत मज नाही की नभी जन्म घेई ॥

फिरुन फिरुन येई शब्द ऐकावयाला ।
बहुत रिझवितो तो माझिया बा मनाला ॥
जलद जलद चाले रूप पाहावयासी ।
त्वरित पळुन तही फार तो दूर जासी ॥

बघुनि परि तुला मी पावलो फार तोष ।
लवकर पळसी तू कोकिळा हा न दोष ॥
बसुनि परि कुठेही गोड वाणीस काढी ।
परिसुनि रव माझे चित्त घेईल गोडी ॥

हरित बहुत ऐसे शोभती पंख ज्याला।
सुबक अमल चंचू लाजवी पोवळ्याला ॥
मधुर वदुन शब्दां तोषवी मानवाला।
धरुनि जन अशाही कोंडिती की शुकाला ॥

म्हणवुनि तुजलागी धाक वाटे जनांचा।
पळुन करिसि वाटे आसरा काननाचा ॥
परि न समचि मानी कोकिळा सर्व लोक।
धरुनि तुजसि द्याया इच्छितो मी न षोक ॥

तरुवर सुफलांनी युक्त झाले कितीक।
कुसुमित दिसताती हे किती येथ देख ॥
झुळ झुळ झुळ आहे मंद वाहात वात।
निज किलबिल शब्दे पाखरे बोलतात ॥

सुरुचिर वनशोभा सोडुनी पिंजऱ्यात।
रुचि न तव मनाला राहणे दे निवांत ॥
मम मन न कधी बा इच्छिते जे अनिष्ट।
तुज बहु गमते ते हो स्वचित्तात तुष्ट ॥

परि न सकळ माझ्यासारखे लोक पाहे।
म्हणवुनि पिकराया दूर तू दूर राहे ॥
बसुनि वरि तरूच्या गोड वाणी वदे तू।
पुरविन मनिचा मी येथ येऊन हेतू ॥



रव – आवाज; अवनितल – जमीन; परिसुनि – ऐकून; रिझवितो – आनंद देतो; तोष – आनंद; अमल – स्वच्छ; तुष्ट – समाधानी; पिक – कोकिळ.

अभ्यास :

१. 'खग न मजसि वाटे शब्द हा धावताहे' असे कवीला का वाटते ?
२. कोकिळ रानात का राहतो असे कवीला वाटते ?
३. 'पिकराया तू दूर दूर राहे' असे कवी का सांगतो ?



## १२. उगवला नारायण

तुम्ही काही लोकगीते वाचली आहेत. 'उगवला नारायण' हेही एक लोकगीतच आहे. या लोकगीतात सोप्या शब्दांत किती सहजतेने बहारीच्या कल्पना व्यक्त केल्या आहेत, पाहा !

"उगवला नारायण आधी आला माझ्या दारी
दहिभाताची न्याहरी मग पिरथी धुंडी सारी

उगवला नारायण केळीच्या ग कोक्यातून
धुंडीतो ग अमृतबाळ बाई फिरतो मळ्यातून

उगवला नारायण　　अंगणात प्रकाशला
हळदी-कुंकवाचा वटा　　माझ्या शालूचा माखला

उगवला नारायण　　लाल शेंदराच्या खापा
　　फुले अंगणात चाफा

उगवला नारायण　　चढे झाडाझुडांवरी
　　तेज पडे चुड्यांवरी

उगवला नारायण　　अगनीचा ग पुडका
　　आत मोत्याचा सडका

उगवला नारायण　　सारी उजळे दुनिया
　　किती लावाव्या समया

उगवला नारायण　　पसरलं पिवळं ऊन
　　बाई हसलं हिरवं रान

उगवला नारायण　　तिरिप पिवळी छान
　　हसे मखमल रानोरान

उगवला नारायण　　"आता काय मागू त्याला?"
सावळे ग मैनाबाई　　"औख माग कुंकवाला"

सडका – शिडकावा

अभ्यास :

१. सूर्यनारायण उगवल्यामुळे सृष्टीवर काय काय परिणाम झाला?
२. या लोकगीताच्या शेवटी सूर्यनारायणाजवळ कोणती मागणी केली आहे?
३. खालील ओळींतील कल्पना स्पष्ट करा :
   उगवला नारायण केळीच्या ग कोक्यातून
   　　धुंडीतो ग अमृतबाळ बाई फिरतो मळ्यातून

## १३. अनामिकास



**कुसुमाग्रज**

वि. वा. शिरवाडकर (जन्म : १९१२.) यांची 'हळूच या हो, हळूच या' ही कविता तुम्ही पूर्वी वाचलीच आहे. 'विशाखा', 'किनारा' इत्यादी कवितासंग्रह, 'दुसरा पेशवा', 'दूरचे दिवे', 'वीज म्हणाली धरतीला' ही नाटके व 'जान्हवी' कादंबरी इत्यादी त्यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. 'अनामिकास' ही कविता त्यांच्या 'किनारा' या संग्रहातून घेतली आहे.

स्वदेशरक्षणासाठी बलिदान करणाऱ्या एका सामान्य वीरास कवीने या कवितेत अभिवादन केले आहे.

अनाम वीरा जिथे जाहला तुझा जीवनान्त
स्तंभ तिथे ना कुणी बांधला, पेटली न वात!
धगधगता समराच्या ज्वाला या देशाकाशी
जळावयास्तव संसारातुन उठोनिया जाशी!
मूकपणाने तमी लोपती संध्येच्या रेषा—
मरणामध्ये विलीन होसी, ना भय ना आशा!
जनभक्तीचे तुझ्यावरी नच उधाणले भाव
रियासतीवर नसे नोंदले कुणी तुझे नाव!
जरी न गातिल भाट डफावर तुझे यशोगान
सफल जाहले तुझेच हे रे, तुझेच बलिदान!
काळोखातुनि विजयाचा ये पहाटचा तारा
प्रणाम माझा पहिला तुजला मृत्युंजय वीरा!



**अभ्यास :**

१. या कवितेतील वीरास 'अनाम वीर' असे का म्हटले आहे?
२. त्याने कोणत्या प्रसंगी प्राणार्पण केले? कसे?
३. कवीने त्याला 'मृत्युंजय' का म्हटले आहे?



## १४. सुभद्रेचा शोक

### श्रीधर

अठराव्या शतकातील एक विशेष लोकप्रिय पंडित कवी. 'हरिविजय', 'पांडवप्रताप' आणि 'शिवलीलामृत' हे त्यांचे ग्रंथ आजही घरोघरी भक्तिभावाने वाचले जातात. 'सुभद्रेचा शोक' हा उतारा त्यांच्या 'पांडवप्रताप' या ग्रंथातून घेतला आहे.

कौरव-पांडवांच्या युद्धात द्रोणाचार्यांनी चक्रव्यूहाची रचना केली. तो भेदून जाण्यासाठी बाळ अभिमन्यू पुढे सरसावला. त्याने मोठ्या शौर्याने, शर्थीने चक्रव्यूहाचा भेद केला. परंतु चक्रव्यूहातून परतण्याची विद्या त्याला माहीत नसल्यामुळे तो मारला गेला. त्याच्या मृत्यूचे वर्तमान ऐकून त्याची आई सुभद्रा शोकाकुल झाली. कवी श्रीधर यांनी तिच्या शोकाचे कसे हृदयद्रावक वर्णन केले आहे, पाहा.

सुभद्रेसे न धरवे धीर। शरीर टाकिले पृथ्वीवर। माझा अभिमन्य सुकुमार। दावा एकदा पाहीन मी ॥ १ ॥ हे अभिमन्या कमळ-लोचना। हे सौभद्रा चंद्र-वदना

हे कोमलांगा मधुरभाषणा। ये धावूनि मज भेटे ॥ २ ॥ हे घनःश्याम-वर्णा। हे अभिमन्या प्रति-अर्जुना। हे महावीरा सुहास्य-वदना। ये धावूनि मज भेटे ॥ ३ ॥ द्रौपदी म्हणे, अभिमन्या। हे वत्सा सद्‌गुण-निधाना। हे तरुणा तुझी अंगना। उत्तरा आता करील काय ॥ ४ ॥ हे किशोर-वया परम उदारा। समर-धीरा प्रताप-शूरा। पांडव-कुल-दीपका सुंदरा। केली त्वरा सर्वां आधी ॥ ५ ॥ उत्तरेच्या गळा मिठी घालिती। सुभद्रा द्रौपदी शोक करिती। ते देखोनि पार्थ श्रीपती। शोकार्णवी बुडाले ॥ ६ ॥ बोले सुभद्रा वेल्हाळ। इतुके वीर असता सबळ। सापडला व्यूहामाजी बाळ। पाठी कोणी न राखेची ॥ ७ ॥ विकळ पडता माझे किशोर। जयद्रथे दिधला लत्ता-प्रहार। धिक् गांडीव धिक् तूणीर। धिक् यदु-वीर पार्थ पै ॥ ८ ॥



अंगना – स्त्री; समरधीरा – रणांगणात धैर्य दाखविणारा; शोकार्णव – शोकाचा सागर.

**अभ्यास :**

१. सुभद्रेच्या शोकाचे कारण कोणते ?
२. सुभद्रेने कोणाचा धिक्कार केला ? का ?
३. सुभद्रेने अभिमन्यूला कोणती विशेषणे लावली ?



# १५. माझ्या जन्मभूमीचे नाव

## रे. ना. वा. टिळक

ना. वा. टिळक (जन्म : १८६२, मृत्यू : १९१९.) हे 'फुलामुलांचे कवी' म्हणून परिचित आहेत. फुलांवर काय किंवा एकंदर निसर्गावर काय, टिळकांचे प्रेम होते. 'टिळकांची कविता' या नावाने त्यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. पुढील कविता याच संग्रहातून घेतली आहे.

पुढे दिलेल्या 'माझ्या जन्मभूमीचे नाव' या कवितेत त्यांनी जन्मभूमीविषयी वाटणारा अभिमान कसा व्यक्त केला आहे, पाहा.

सृष्टी तुला वाहुनी धन्य! माते, अशी रूपसंपन्न तू निस्तुला
तू कामधेनू! खरी कल्पवल्ली! सदा लोभला लोक सारा तुला;

या वैभवाला तुझ्या पाहुनीया मला स्फूर्ति नृत्यार्थ होते जरी
सामर्थ्य नामी तुझ्या आर्यभूमी, तसे पाहिले मी न कोठे तरी!

माते! महात्मे तुझे, तत्त्ववेत्ते, तुझे शूर योद्धे, तुझे सत्कवी,
श्रेणी ययांची सदा माझिया गे मना पूजनी आपुल्या वाकवी!
यांची यशे ज्या नव्या सद्गुणांना मला अर्पिती, ध्येय ते गे जरी,
सामर्थ्य नामी तुझ्या आर्यभूमी, तसे पाहिले मी न कोठे तरी!

तुझ्या महोदार सारस्वताच्या महासागरीचा जरी मीन मी
झालो, तरी गे तृषा मन्मनाची कधीही कधीही न होणे कमी!
आई! गुरुस्थान अंती जगाचे तुझे! यात शंका न काही जरी
सामर्थ्य नामी तुझ्या आर्यभूमी, तसे पाहिले मी न कोठे तरी!

वारा तुझ्या स्पर्शने शुद्ध झाला, मला लाधला! भाग्य हे केवढे!
माते! स्वये देशि जे अन्नपाणी, सुधा बापुडी कायशी त्यापुढे!
तू बाळगीशी मला स्कंधि-अंकी! सुखाची खरी हीच सीमा पुरी!
सामर्थ्य नामी तुझ्या आर्यभूमी, तसे पाहिले मी न कोठे तरी!

निस्तुला–कोणाशीच तुलना होणे शक्य नाही अशी; कल्पवल्ली–इच्छित वस्तू देणारी वेल.
श्रेणी–मालिका.

**अभ्यास :**

१. जन्मभूमीचा उल्लेख करताना कवीने कोणकोणते शब्द योजले आहेत?
२. आपल्या जन्मभूमीचा अभिमान कवीने कोणकोणत्या गोष्टींनी व्यक्त केला आहे?
३. खालील ओळींतील कल्पना स्पष्ट करा :
   तुझ्या महोदार सारस्वताच्या महासागरीचा जरी मीन मी
   झालो, तरी गे तृषा मन्मनाची कधीही कधीही न होणे कमी!
४. आर्यभूमीच्या सामर्थ्याचे वर्णन करताना कवीने अनेक कल्पना केल्या आहेत. त्यांतील तुम्हांला आवडलेली कल्पना कोणती?. का?
५. तुम्ही तुमच्या शाळेबद्दलचा अभिमान दहाबारा ओळींत लिहा. त्यासाठी या कवितेतील काही कल्पनांचा उपयोग करा.



# १६. अभंगवाणी

संतवाणीचा परिचय यापूर्वी तुम्हांला झालेलाच आहे. संतवाणीची वैशिष्ट्येही तुमच्या लक्षात आली आहेत.

नामदेव, जनाबाई, तुकाराम व शेख महंमद यांचे अभंग पुढे दिले आहेत.



१

व्रत तप न लगे करणे सर्वथा । न लगे तुम्हां तीर्था जाणे तया
आपुलेचि ठायी असा सावधान । करा हरिकीर्तन सर्वकाळ
न लगे ते काही वर्जावे अन्न जीवन । लावा अनुसंधान हरीचे पायी
न लगे योगयाग न लगे संगत्याग । असो द्या अनुराग हरीचे पायी
न लगे निरंजनी करणे वास तुम्हां । दृढ धरा प्रेमा हरीचे नामी
नामा म्हणे नाम दृढ धरा कंठी । तेणे देईल भेटी पांडुरंग ॥

—नामदेव

२

ताट विस्तारी रुक्मिणी । देव बैसले भोजनी
इतुक्यामध्ये अकस्मात । ध्वनि उमटला कानात
धावा ऐकता श्रवणी । ताट लोटी चक्रपाणी
उठिला खडबडोनि कैसा । पावे बहिणीचिया क्लेशा
उभी वृंदावनी बाळा । पुढे देखिला सावळा
मुगुट कुंडले मेखळा । वैजयंती वनमाळा
शंख चक्र आयुधे करी । दिसे घवघवीत हरी
झळके पीतांबर कासे । नयनी कोंदला प्रकाशे
पाहता आनंदली मनी । म्हणे नामयाची जनी ॥

—जनाबाई



३

नीचपण बरवे देवा । न चले कोणाचाही हेवा
महापुरे झाडे जाती । तेथे लव्हाळे राहती
येता सिंधूच्या लहरी । नम्र होता जाती वरी
तुका म्हणे कळ । पाया धरिल्या न चले बळ ॥

—तुकाराम



४

दया क्षमा शांती । तेथे देवाची वसती
पावे धावोनिया घरा । राहे धरोनिया थारा
कीर्तनाचे वाटे । बराडिया ऐसा लोटे
तुका म्हणे घडे । पूजानामे देव जोडे ॥

—तुकाराम



५

रविशशी ईश्वराचे दिवटे थोर । या जीवालागी केला उपकार ।
अभक्त मानितीना त्याचा उपकार । विषयी लोलुप जाले ॥
कोणी कोणासी बैसो घातली तिवासी । तो जन्मवरी आठवी उपकारांसी
पहा ईश्वरे अंथरिले महीशी । मूढ उपकार न मानिती ॥
कोणी मंडप दिधल्याचा उपकार । तो जन्मवरी आठविती साचार ।
ईश्वरे मंडप दिधला नभाकार । जीव असोन न मानिती ॥
शेख महंमद म्हणे निर्गुणासी । बा वर्णवेना तुझिया रूपासी ।
अगाध उपकाराच्या राशी । उत्तीर्ण नोहेचि काही ॥

—शेख महंमद



६

कधी खाई तूप-रोटी । कधी राहे अर्धपोटी
कधी झोपे गादीवरी । कधी घोंगडी अंथरी
कधी लोकरीची शाल । कधी पांघरी वाकळ
कधी हवेली सुंदर । कधी चंद्र-मौळी घर
कधी सज्जनांची भेटी । कधी नाठाळांशी गाठी
कधी गळा पुष्प-हार । कधी निंदेचा भडिमार
कधी सुखाचा संसार । कधी हिंडे दारोदार
स्वामी म्हणजे आत्म-स्थित । संत सुखदुःखातीत ॥

—स्वामी स्वरूपानंद

